


नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**

**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ४३। अंक ९। जून १९९०
ज्येष्ठ-आषाढ, शके १९१२.
किंमत ७ रुपये. वार्षिक वर्गणी ६० रुपये.
आजीव सदस्य वर्गणी–
व्यक्ती : रु. ५००/– संस्था : रु. ७५०/–



---



---

संपादकीय पत्रव्यवहार :
मे. पुं. रेगे,
संपादक, 'नवभारत' मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई–४१२ ८०३ (जि. सातारा)

---

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
श्री. ग. दीक्षित,
व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
द्वारा : दी प्राज्ञ प्रेस, वाई–४१२ ८०३.
(जि. सातारा)

---

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियतकालिकासाठी 'स्थायी निधी' निर्माण केला आहे आणि अनुदानही दिले आहे.






# नवभारत

जून १९९०

अ नु क्र म



## लेखक-परिचय


■ **अ. ना. ठाकूर :** मराठी विश्वकोशात भूविज्ञान, धातुविज्ञान, वातावरणविज्ञान इत्यादी विषयांचे संपादक, वाई–४१२ ८०३. ■ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी :** प्राज्ञपाठशाळामंडळाचे अध्यक्ष; अध्यक्ष, मराठी विश्वकोश निर्मिति मंडळ व प्रमुख संपादक, विश्वकोश, धर्मकोश, वाई–४१२ ८०३. ■ **वसंत स. खोकले :** भाषाविज्ञान प्रमुख; भाषाविज्ञान विभाग, मुंबई विद्यापीठ, मुंबई. ■ **सु. बा. कुलकर्णी :** विभागप्रमुख, भाषाविज्ञान विभाग, नागपूर विद्यापीठ, नागपूर; शकुंतला सदन, ७५ रामदास पेठ, नागपूर–४४० ०१०



अनुक्रमणिका









## संपादकीय

### हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन (११)*

(मोक्ष हा एक पुरुषार्थ आहे, किंबहुना सर्वश्रेष्ठ पुरुषार्थ आहे, म्हणजे माणसाचे सर्वोच्च साध्य आहे असे मानणाऱ्या सांख्यदर्शनाचा परिचय आपण गेल्या लेखांकात करून घेतला. मोक्ष हा पुरुषार्थ आहे ह्या कल्पनेत असे अभिप्रेत आहे की पुरुष–माणूस–एका बंधनात अडकला आहे. ही अर्थात अनिष्ट अवस्था आहे. आणि ह्या बंधनातून स्वतःला मोकळे करणे, आपले मूळचे स्वातंत्र्य परत प्राप्त करून घेणे ही माणसाच्या दृष्टीने इष्ट अशी गोष्ट आहे; हे माणसाचे स्वाभाविक साध्य आहे.

आपण पाहिले त्याप्रमाणे सांख्याच्या दृष्टीने ह्या बंधनाचे स्वरूप थोडक्यात असे आहे : मानवी व्यक्तीचे खरे स्वरूप म्हणजे ती चिन्मात्र असा एक पुरुष असते; चेतना किंवा जाणीव हेच ज्याचे केवळ स्वरूप आहे असा पुरुष. हे पुरुषाचे मूळचे, शुद्ध स्वरूप आहे. पण अज्ञानाने हा पुरुष स्वतःहून भिन्न असलेल्या, जड, अजाण अशा प्रकृतीचा एक भाग आणि एक निर्मिती असलेल्या एका देह–चित्त–व्यूहाशी स्वतःचे, तादात्म्य मानतो, हा देह–चित्त–व्यूह म्हणजे आपणच आहोत असे मानतो. पुरुषाने विशिष्ट देह–चित्त–व्यूहाशी कल्पिलेल्या तादात्म्यामुळे, ह्या व्यूहात उद्भवणाऱ्या अवस्था, वृत्ती पुरुषाच्या जाणिवेकडून प्रकाशित होतात. ह्या चित्तवृत्ती वस्तुतः जड, अजाण असतात; पण पुरुषाच्या जाणिवेकडून त्या सजाण बनतात. अनुभव हे त्यांचे स्वरूप बनते. शिवाय पुरुष चित्ताशी तादात्म्य पावल्याने आणि चित्ताच्या ठिकाणी अहंकार असल्यामुळे हे अनुभव आपले स्वतःचे अनुभव आहेत, ही माझी सुखदुःखे आहेत, माझे भोग आहेत असे पुरुष मानतो. केवळ जाणीव हे स्वतःचे शुद्ध स्वरूप हरवून सुखदुःखाचे अनुभव ज्याला प्राप्त होतात असा एक विषयी आपण आहोत आणि हे अनुभव ज्या माध्यमाद्वारा त्याला लाभतात तो देह–चित्त–व्यूह म्हणजे आपणच आहोत असे तो मानू लागतो. हे पुरुषाचे अज्ञान आणि हे त्याचे बंधन.)

पण समजा, पुरुष स्वतःचे मूळ स्वरूप विसरून एका परक्या देह–चित्त–व्यूहाशी एकरूप झाला आणि सुखदुःखाचा अनुभव घेऊ लागला तर त्यामुळे काय बिघडले? ह्याचे पहिले उत्तर असे, की ह्या स्वरूपाचे अस्तित्व दुःखमय आहे. पुरुषाला जे अनुभव प्राप्त होतात ते मूलतः दुःखद असतात; जे थोडे सुख मिळते तेही दुःखाने ग्रासलेले असते. हे विश्व हा आनंदाचा आविष्कार आहे आणि विश्वचक्राचा भाग असलेले मानवी जीवन आनंदमय आहे, माणूस योग्य रीतीने–धर्माला अनुसरून जगला, तर त्याचे जीवन विश्वाच्या आनंदात सहभागी होऊ शकते ही वैदिक दृष्टी होती हे आपण पाहिले. विश्वाच्या पसाऱ्यात गुरफटलेले मानवी अस्तित्व हे स्वभावतःच दुःखमय आहे ही श्रमण, अवैदिक दृष्टी होय.

ह्या दुःखाला एक खोल अर्थ आहे. माणूस सुखदुःख अनुभवतो, सुख लाभले तर ते टिकून राहावे, परत अनुभवायला मिळावे अशी इच्छा त्याला होते, दुःख लाभले तर ते नाहीसे व्हावे, फिरून त्याचा अनुभव येऊ नये अशी इच्छा होते, ह्या इच्छांना अनुसरून तो कृत्ये करतो, ही कृत्ये नैतिक दृष्ट्या चांगली किंवा वाईट असतात, कृत्य चांगले असेल तर त्याच्या चांगुलपणाचे पारितोषिक म्हणून त्याच्या चांगुलपणाच्या प्रमाणात माणसाला सुख अनुभवायला मिळते, वाईट कृत्याचे शासन म्हणून दुःख मिळते, ह्या सुखदुःखाच्या अनुभवातून फिरून इच्छा-द्वेष निर्माण होतात, त्यांचा आविष्कार कृत्यांत होतो, त्यातून परत सुखदुःखांचा अनुभव येतो... सुखदुःख, इच्छा, कर्मे, सुखदुःख हे रहाटगाडगे आपल्या गतीने फिरत राहते, त्यात माणूस फरफटत जातो. माणसाच्या मृत्यूनेही ही फरफट थांबत नाही. माणसाने जी कर्मे केलेली असतात त्यांची चांगली-वाईट फळे विश्वाच्या घडणीतच अंतर्भूत असलेल्या नियमाला अनुसरून त्याला भोगावीच लागतात. म्हणून मृत्यूमुळे जरी माणसाच्या सांप्रतच्या देहाचे विसर्जन झाले तरी त्याला फिरून एक वेगळा देह-चित्त-व्यूह प्राप्त होतो आणि त्याच्या माध्यमातून त्याला ही फळे भोगणे प्राप्त होते. हे रहाटगाडगे जन्ममरणांना ओलांडत फिरत राहते.

---

* या संपादकीयाचे पहिले दहा भाग अनुक्रमे जुलै ८८, जाने., फेब्रु., मार्च, एप्रिल, मे, नोव्हेंबर ८९ व मार्च, एप्रिल, मे ९० या अंकांत प्रसिद्ध झाले होते. हा अकरावा भाग. – संपादक.

अनुक्रमणिका

त्याच्या गतीला प्रारंभ कधी झाला ? त्याच्या गतीला प्रारंभ झालाच नाही. त्याची गती अनादी आहे आणि माणूस त्याच्यात अडकलेला आहे आणि असाहाय्यपणे त्यातून फरफटत जातो आहे. माणसाच्या ह्या परवशतेत मानवी अस्तित्वाच्या दुःखमयतेचे मूळ आहे. ही परवशता हेच दुःख आहे.

पुरुष स्वतःचे खरे स्वरूप दृष्टिआड करून, आपण केवळ जाणीव आहोत हे स्वतःचे खरे स्वरूप हरवून, स्वतःला परका असलेला देहचित्तव्यूह म्हणजेच आपण असे जे मानतो ती मूळ अविद्या. ही अनादी आहे आणि म्हणून इच्छा-कर्म-सुखदुःख-इच्छा हे दुःखमय रहाटगाडगे, जन्ममृत्यूचा फेरा हाही अनादी आहे. दुःखाचा अंत करायचा तर अविद्येचा अंत केला पाहिजे. आणि अविद्येचा अंत करायचा तर पुरुषाचे स्वतःचे जे खरे स्वरूप आहे त्याचे ज्ञान त्याला झाले पाहिजे. आपण शुद्ध जाणीव आहोत, हे ज्ञान म्हणजे इच्छा, सुखदुःख इ. ज्या चित्तवृत्तींना आपण स्वतःचे अनुभव मानतो त्या केवळ जड प्रकृतीतील घडामोडी आहेत, त्यांचा आपल्याशी काही संबंध नाही हे ज्ञान होय. हे ज्ञान झाले की पुरुष इच्छा-सुखदुःखांत गुंतून पडणार नाही, त्याच्या हातून कर्मे होणार नाहीत, प्रकृतीतील घडामोडी तिच्या स्वतःच्या स्वभावानुसार घडत राहतील; पण पुरुषाचे अनुभव असे त्यांचे स्वरूप उरणार नाही. अनादी काळापासून अज्ञानामुळे प्रकृतीत गुंतलेला पुरुष मुक्त होईल; त्याच्या खऱ्या स्वरूपातील त्याचे अस्तित्व, केवळ जाणीव ह्या स्वरूपातील त्याचे अस्तित्व सिद्ध होईल. त्याला कैवल्य प्राप्त होईल.

आता हे ज्ञान मिळविण्याचा मार्ग कोणता ? पुरुष व एक विशिष्ट देहचित्त-व्यूह ह्यांची जी कल्पित युती असते तिला जीव म्हणूया. आपण हे पाहिले आहे की केवळ पुरुष जीव नाही; पुरुष ही केवळ जाणीव आहे. केवळ देहचित्त-व्यूह हा जीव नाही. चित्तात घडणाऱ्या घटना अजाण असतात. अनुभव हे त्यांचे स्वरूप नसते. पुरुष देहचित्तव्यूहाशी, एकरूपता, पावल्यामुळे पुरुषाच्या जाणिवेने चित्तातील घटना प्रकाशित होतात, त्या जाणिवेची रूपे किंवा अनुभव बनतात. आता अशी कल्पना करूया की चित्तात सुख ह्या स्वरूपाची घटना घडते. पुरुषाच्या जाणिवेने ती प्रकाशित झाल्यामुळे सुखाचा अनुभव सिद्ध होतो. आता ह्या अनुभवाचे स्वरूप सुखाचा अनुभव एवढेच राहील. माझा सुखाचा अनुभव असे त्याचे स्वरूप असणार नाही. पुरुष ह्या अनुभवाचा हा केवळ साक्षी राहील. पण चित्त हे अहंकाराने युक्त असे असते. तेव्हा चित्तात निर्माण झालेली सुख ह्या स्वरूपाची घटना **माझे सुख** ह्या स्वरूपाची असते. म्हणून पुरुषाला येणारा अनुभव **माझ्या सुखाचा** अनुभव ह्या स्वरूपाचा असतो. आणि ह्या अहंकारातून, स्वतःचे सुख साधण्याच्या वृत्तीतून कृत्य निर्माण होते. आणि कर्म-फल-कर्म ह्या चक्रात जीव अडकतो. चित्त जर अहंभावापासून मुक्त असते तर जीव केवळ साक्षी, पाहणारा राहिला असता. तो भोक्ता आणि कर्ता नसता. आपण असे मानूया की सुखाच्या अवस्थेचा स्वाभा-विक परिणाम म्हणून ती अवस्था टिकवून धरण्याचा प्रयत्न करणारी कृती घडते. पण पुरुष जर केवळ साक्षी असता तर सुखाची अवस्था अस्तित्वात आली आहे, ती टिकवून धरणारी कृती घडत आहे असे अनुभव त्याला आले असते. मी सुख भोगीत आहे, माझे सुख टिकवून धरण्यासाठी मी कृती करीत आहे असे अनुभव त्याला जे येतात ते चित्ताच्या अहंभावामुळे. ह्या अहंभावामुळे जीव कर्माच्या सापळ्यात अडकतो.

तेव्हा कर्माच्या सापळ्यातून सुटण्यासाठी दोन गोष्टी कराव्या लागतील. एक तर सुखाची जीवाला स्वाभाविक लालसा असते, दुःखाविषयी विद्वेष, तिटकारा असतो. आणि ह्यातून कर्मे घडतात. तेव्हा प्रयत्नपूर्वक सुखाची लालसा आणि दुःखाचा द्वेष ह्यांना क्षीण करीत नेले पाहिजे. पण दुसरी गोष्ट म्हणजे अहंभावाचे पूर्णपणे विसर्जन केले पाहिजे. लालसा आणि द्वेष हे जसे चित्ताचे स्वाभाविक धर्म आहेत त्याप्रमाणे अहंभाव हाही आहे. चित्ताच्या अहंभावामुळे जीवाला आपण एक विशिष्ट जीव आहोत, इतरांहून भिन्न आहोत अशी जाणीव होते. स्वतःच्या सुखदुःखांना त्याच्या दृष्टीने सार्वभौम महत्त्व असते. इतर जीवांची सुखदुःखे, सृष्टीच्या पसाऱ्यातील इतर वस्तूंप्रमाणे फार तर त्याच्या अनुभवाचे विषय असतात. त्याच्या स्वतःच्या इच्छा, सुखदुःखे हे त्याच्या अनुभवाचे केवळ विषय नसतात; तर त्याच्या स्वतःच्या बऱ्यावाईट अशा अवस्था असतात. म्हणून त्यांच्यापासून त्याला त्याची साध्ये प्राप्त होतात, त्यांच्याविषयी त्याला कर्तव्य असते. त्याच्या परिसरातील भौतिक वस्तूंनी जशी त्याची परिस्थिती बनलेली असते त्याप्रमाणे त्याच्या अवतीभोवती जे जीव असतात त्यांचे ज्ञान, शक्ती, इच्छा, सुखदुःख हाही त्याच्या परिस्थितीचा एक घटक असतो. स्वतःची सुखप्राप्ती आणि

अनुक्रमणिका

दुःखहानी ही जी त्याची साध्ये असतात त्यांच्या साधनेवर ह्या परिस्थितीचा अनुकूल-प्रतिकूल परिणाम होत असतो हे ज्ञान अहंकेंद्री कर्त्या जीवाला असते. ह्या ज्ञानाचा उपयोग स्वतःची साध्ये सिद्ध करताना तो करीत असतो. इतर जीवांची सुखदुःखे, त्यांच्या अवस्था ही अहंभावी जीवाची केवळ साधने असतात. प्रत्येक जीवाचा इतर जीवांकडे पाहण्याचा हा स्वाभाविक दृष्टिकोण असतो.

आता जीव इतर काही जीवांना स्वाभाविकपणे आपले मानीत असेल, त्यांच्याविषयी त्याला ममत्व वाटत असेल, म्हणजे त्यांच्या सुखदुःखांत तो स्वतःचे सुखदुःख पाहात असेल आणि म्हणून त्यांचे सुख हे त्याचे स्वतःचे साध्य बनेल. उदा., आईला आपल्या अपत्यांविषयी स्वाभाविकपणे प्रेम वाटते. पण हे ममत्व अहंभावाच्या विरोधी नाही. त्यात होते ते एवढेच की अहंभावाचे क्षेत्र, आपण ज्याला एक जीव मानतो त्याच्या पलीकडे विस्तारते. इतर जीव त्याच्यात सामावले जातात.

तेव्हा अहंभावाचे विसर्जन करण्यासाठी जाणीवपूर्वक प्रयत्न करावे लागतील. इतर जीवांची अवस्था आणि स्वतःची अवस्था ह्यांच्यामध्ये आपण स्वाभाविकपणे जो भेदभाव करतो त्याच्या पलीकडे जाणारी, त्याचे निरसन करणारी वृत्ती जाणीवपूर्वक अंतःकरणात बाणवून, त्या वृत्तीला अनुसरून जगण्याचा प्रयत्न नेटाने करावा लागेल. अशी वृत्ती म्हणजे आत्मौपम्य बुद्धी– इतर जे आहेत ते आपणच आहोत असे मानणारी वृत्ती. 'स्वहितरती'च्या जागी 'सर्वभूतहितरती'ची जोपासना करावी लागेल.

ह्या साधनेचा एक भाग म्हणजे मैत्री, करुणा, मुदिता आणि उपेक्षा ह्या मूल्यांचा, ब्रह्मविहारांचा अंतःकरणात परिपोष करणे. मैत्री म्हणजे सर्व जीवांविषयीचा प्रेमभाव, करुणा म्हणजे कुणाच्याही दुःखाने व्यथित होऊन ते दूर करायला झटणे, मुदिता म्हणजे कुणाच्याही सुखाने सुखी होणे आणि उपेक्षा म्हणजे दुसरा आपल्याशी कसा वागतो त्याच्या निरपेक्ष त्याच्याशी समबुद्धीने वागणे. एक गोष्ट येथे स्पष्ट करणे कदाचित आवश्यक आहे. सर्व माणसांशी ह्या वृत्तीने वागणे एवढेच ह्या साधनेत अभिप्रेत नाही तर जीवमात्राशी ह्या वृत्तीने वागले पाहिजे अशी आकांक्षा आहे. सर्व प्राणी आणि सर्व वनस्पती जीव आहेत. कोणत्याही जीवाकडे आपल्या सुखाचे साधन म्हणून पाहता कामा नये. प्रत्येक जीवाची अभिवृद्धी होईल अशा रीतीने वागले पाहिजे.

बौद्धसंप्रदायात ह्या मूल्यांना पारमिता म्हणतात. पारमिता म्हणजे ज्यांची साधना अमर्यादपणे केली पाहिजे अशी मूल्ये. अहिंसा ह्या एका मूल्यात ह्या सर्व मूल्यांचा समावेश करता येईल. अहिंसा म्हणजे इतर जीवांना अपाय न करणे एवढेच नव्हे तर इतर जीवांचे जे स्वतःचे जीवन असते त्याचा परिपोष व्हावा यासाठी सतत प्रयत्नशील असणे.

अहंभावाचे विसर्जन करू पाहणाऱ्या ह्या साधनेची आता सांख्यपरिभाषेत मांडणी करूया. सांख्यपरिभाषा मानवी अस्तित्वाविषयीचे एक रूपक रचते असे तिच्याकडे पाहिले तर ती समजून घेऊन तिचा स्वीकार करणे सोपे जाईल. अर्थात असे करताना मानवी अस्तित्वाविषयी इतरही रूपके असू शकतात हे भान राखले पाहिजे.

पुरुषाव्यतिरिक्त जी प्रकृती किंवा निसर्ग आहे तो सत्त्व, रज आणि तम ह्या तीन प्रकारच्या गुणांचा बनलेला आहे. पुरुष म्हणजे ज्याला केवळ जाणीव आहे असे अस्तित्व. ज्या वस्तूंची ही जाणीव असते ते जाणिवेचे विषय प्रकृतीत मोडतात. आपले शरीर आणि मन, मनाच्या सर्व अवस्था ह्या प्रकृतीतील घडामोडी असतात. मनाच्या अवस्था वस्तुतः जड, अचेतन असतात. पण त्या प्रामुख्याने सत्त्वगुणांच्या बनलेल्या असतात आणि सत्त्वगुण हे पुरुषाच्या जाणिवेच्या प्रकाशाशी संवादी असतात; ह्या प्रकाशाने उजळून निघण्याचा धर्म त्यांच्या ठिकाणी असतो. अचेतन मनोवस्था किंवा अंतःकरणवृत्ती अशी पुरुषाच्या जाणिवेने लखलखली की ती पुरुषाचा अनुभव बनते. पुरुषाच्या जाणिवेचा तो साक्षात विषय बनतो.

आता ज्ञान हे वस्तुनिष्ठ असते. ज्ञानाचा विषय असलेल्या वस्तूचे जे स्वतःचे स्वरूप असते ते तसेच जर ज्ञानात प्रतिबिंबित होत असेल, त्या स्वरूपाचेच ग्रहण ज्ञानात होत असेल तर ते ज्ञान प्रमाण असते. आता वस्तुनिष्ठता हा जो प्रमाणज्ञानाचा धर्म असतो त्याच्याशी निगडित असलेला दुसरा धर्म आहे. एका पुरुषाला एखाद्या विषयाचे झालेले ज्ञान जर प्रमाण व म्हणून वस्तुनिष्ठ असेल आणि दुसऱ्या पुरुषाला झालेले ज्ञानही वस्तुनिष्ठ असेल तर ह्या दोन्ही ज्ञानांचा आशय पूर्णपणे समान, एकरूप असणार. म्हणजे








प्रमाणज्ञान हे विषयीनिरपेक्ष, व्यक्तिनिरपेक्ष असते. सर्व ज्ञात्यांना समान असलेल्या अशा सार्वत्रिक दृष्टीने ज्ञान आपल्या विषयाकडे पाहते.

मनाच्या अवस्था, अंतःकरणवृत्ती, म्हणजे आपल्या इंद्रियसंवेदना, इच्छा, भावना, कल्पना इ. ह्या प्रामुख्याने सत्त्वगुणांच्या बनलेल्या असतात हे खरे. पण त्यांच्यात रजोगुण आणि तमोगुण ह्यांची नेहमीच भेसळ असते. रजोगुण हे गती, स्थित्यंतर घडवून आणणारे गुण आहेत. आपल्या इच्छा कार्यप्रवण असतात; कृत्यांमध्ये त्यांचा आविष्कार होतो. म्हणून त्यांच्यात रजोगुण असतातच. पण वस्तूविषयीच्या आपल्या संवेदना, कल्पना इ. अंतःकरणवृत्तीमध्येही रजोगुणांचे मिश्रण असते. कारण आपल्या इच्छांचा पगडा त्यांच्यावर असतो. सत्त्वगुणांचे धर्म दोन आहेत. जो विषय असेल त्याच्या स्वतःच्या स्वरूपाचा यथातथ्य आकार सत्त्वगुण धारण करतात, हा एक धर्म. दुसरा धर्म, वर म्हटल्याप्रमाणे पुरुषाच्या प्रकाशाने उजळून निघण्याचा धर्म. जर अंतःकरणवृत्ती केवळ सत्त्वगुणांची बनलेली असेल तर तिच्यापासून वस्तूचे वस्तुनिष्ठ, अविकृत ज्ञान होते.

आपल्या इच्छा ह्या अंतःकरणवृत्ती असल्यामुळे प्रामुख्याने सत्त्वगुणांच्या बनलेल्या असतात. पण त्या इच्छा असल्यामुळे त्यांच्यात रजोगुण अनिवार्यपणे असतात. तथापि, इच्छा कमी-अधिक सात्त्विक असू शकतात. इच्छा जितकी अधिक वस्तुनिष्ठ, अधिक व्यक्तिनिरपेक्ष, जितकी अधिक सार्वत्रिक दृष्टिकोणावर आधारलेली असेल तितकी ती अधिक सात्त्विक असते. ती जितकी व्यक्तिसापेक्ष, व्यक्तिकेंद्री असेल तितकी ती कमी सात्त्विक असेल. ज्या इच्छेचे समाधान केल्याने व्यक्तीच्या हितावर, तिच्या इतर इच्छांच्या समाधानावर प्रतिकूल परिणाम होणार असतो अशी इच्छा अज्ञानावर आधारलेली आणि म्हणून त्या प्रमाणात तामस असते. केवळ स्वतःच्या सुखदुःखाशी निगडित असलेली इच्छा राजस असते. उलट, मैत्री, करुणा, मुदिता आणि उपेक्षा ह्या वृत्तींना किंवा थोडक्यात अहिंसेच्या वृत्तीला अनुसरणाऱ्या इच्छा व्यक्तिनिरपेक्ष असतात. इच्छा म्हणून त्या राजस असल्या तरी अहंकारी इच्छांपेक्षा त्या अधिक सात्त्विक असतात. ह्या वृत्तींना अनुसरून जगण्याने व्यक्तीचे अंतःकरण अधिकाधिक सात्त्विक बनत जाते. ह्या वृत्तींना साधारण धर्म म्हणूया.

पुरुषाच्या प्रकाशाने स्वतः जड असलेली अंतःकरणवृत्ती उजळून निघते आणि एक अनुभव हे स्वरूप तिला प्राप्त होते हे रूपक जरा तपशिलात जाऊन पाहूया. अंतःकरण हे प्रामुख्याने सत्त्वगुणांचे बनलेले असल्यामुळे त्याच्यात पुरुष प्रतिबिंबित होऊ शकतो. एखाद्या तलावात चंद्राचे प्रतिबिंब पडावे आणि पाणी उजळून निघावे त्याप्रमाणे पुरुषांच्या प्रतिबिंबाने अंतःकरण आणि त्याच्या वृत्ती उजळून निघतात; सजाण बनतात. पुरुष हा केवळ विषयी, द्रष्टा आहे. तो दृश्य विषय नाही. ह्यामुळे पुरुषाला स्वतःचे साक्षात दर्शन, ज्ञान होऊ शकत नाही. पण त्याला अंतःकरणात स्वतःच्या पडलेल्या प्रतिबिंबाचे ज्ञान होते. आता सामान्यपणे अंतःकरण अहंभावाने युक्त असते. अहंभावात राजसपण असते. कोणतीही विशिष्ट अंतःकरणवृत्ती घेतली तर तिच्यात तमोगुणांचा अंश असतो. नाही तर इतरांपासून भिन्न असलेली विशिष्ट वृत्ती असे तिचे स्वरूप असणार नाही. अहंभाव हा क्रियाप्रवण असल्यामुळे त्याच्यात रजोगुण असतातच तेव्हा अंतःकरण हे सामान्यपणे तमोगुणांमुळे गढूळलेले आणि रजोगुणांमुळे चंचल असते. त्याच्यात पडलेले पुरुषाचे प्रतिबिंब ह्यामुळे विकृत असते. विशिष्ट अनुभव घेणारा आणि विशिष्ट इच्छांनी प्रेरित होऊन कर्मे करणारा भोक्ता आणि कर्ता ह्या स्वरूपांत पुरुषाला आपल्या प्रतिबिंबाचे दर्शन होते. पण हे पुरुषाचे खरे स्वरूप नव्हे.

पण आता अशी कल्पना करूया की अंतःकरणातून सर्व रजोगुणांचा आणि तमोगुणांचा निचरा झाला आहे. ते केवळ सत्त्वगुणांचे बनले आहे. तलावाचे पाणी पूर्णपणे निश्चल आणि पूर्णपणे स्वच्छ असावे तसे अंतःकरण झाले आहे. त्याच्यात पुरुषाचे जे प्रतिबिंब पडेल ते केवळ अविकृत, यथामूल असेल. अहंकारी-विषयी असे त्या प्रतिबिंबाचे स्वरूप असणार नाही. केवळ जाणीव असे त्याचे स्वरूप असेल. पुरुषाला स्वरूपाचे यथार्थ ज्ञान होईल. तो मुक्त होईल.

सारांश, अंतःकरण अधिकाधिक शुद्ध करीत नेणे, ह्यासाठी अहंकाराचे पूर्णपणे विसर्जन करणे हा मोक्ष साधण्याचा मार्ग आहे आणि साधारण धर्मांचे निष्ठेने आचरण करीत राहणे हे ह्या मार्गाचे स्वरूप आहे.

पण ह्या रूपकाचा अर्थ सरळ भाषेत आता मांडला पाहिजे. (अपूर्ण)



अनुक्रमणिका

# भारतीय वैज्ञानिकांचा विशाल परंतु असंघटित समाज*

अ. ना. ठाकूर

देशातील वैज्ञानिकांची संख्या विचारात घेतल्यास या बाबतीत भारत हा जगातील तिसऱ्या क्रमांकाचा देश ठरतो. पाकिस्तानातील शास्त्रज्ञ अब्दूस सलाम भारतात आले होते तेव्हा ते जेथे जेथे गेले, तेथे तेथे हे त्यांना अभिमानाने सांगण्यात आले. यावरून त्यांनी भाकीत केले की, २००० साली भारत ही वैज्ञानिक महासत्ता बनेल.[१] स्वातंत्र्योत्तर काळात भारतात वैज्ञानिक संशोधनात करण्यात आलेली गुंतवणूक तसेच वैज्ञानिक आणि तंत्रज्ञ यांची संख्या या दोन बाबतींत झालेली वाढ खरोखरच नजरेत भरण्यासारखी आहे. १९५० साली भारतात १ लाख ८८ हजार वैज्ञानिक व तंत्रज्ञ होते; तर १९८३ साली ही संख्या सुमारे २४ लाख ६५ हजारांहून जास्त झाली होती.[२] १९४८-४९ साली विज्ञान व तंत्रज्ञानावर १·१ कोटी रुपये खर्च करण्यात आले होते; तर १९८०-८१ साली हीच रक्कम ७२·६१४ अब्ज रुपयांवर गेली होती.[३] तसेच विज्ञान व तंत्रज्ञान यांतील संशोधनासाठी लागणारी बहुतेक साधनसंपत्ती ही भारत सरकारकडून मिळत असते.[४]

भारतातील वैज्ञानिक संशोधन चार प्रकारच्या संस्थांमधून संघटित झालेले आढळते आणि पुष्कळसे संशोधन हे राष्ट्रीय प्रयोगशाळा आणि केंद्र सरकारच्या विभागांतील ( खात्यांमधील ) विविध संस्था यांमधून होत असते. राज्य सरकारेही काही संशोधन प्रकल्प हाती घेत असतात. निरनिराळी विद्यापीठे, तंत्रविज्ञान-विषयक संस्था आणि विशिष्ट स्वायत्त संशोधन संस्था येथेही असे संशोधन होत असते. आणि अखेरीस खासगी उद्योगांकडूनही औद्योगिक संशोधनाचे प्रकल्प राबविले जातात. मात्र या वेगवेगळ्या प्रकारच्या संस्थांमध्ये संशोधनाच्या बाबतीत प्रत्यक्षात परस्पर-संबंध वा सुसंगती असल्याचे आढळत नाही. एकूणच विद्यापीठांना वैज्ञानिक संशोधनासाठी तुलनेने थोडीच साधनसंपत्ती देण्यात येते. अवकाशविज्ञान, अणुऊर्जा यांसारख्या क्षेत्रांतील संशोधनाकरिता साधनसंपत्ती एकवटल्याने आणि त्याच्याच जोडीने भारतीय शिक्षणात विज्ञानाला असलेल्या गौण स्थानामुळे या दोन क्षेत्रांमध्ये व विद्यापीठांमध्ये संशोधनाच्या कामाला एक प्रकारची सुस्ती आलेली दिसते.[५] दिल्ली, मुंबई, खरगपूर, कानपूर व मद्रास येथील भारतीय विज्ञान व तंत्रविद्या संस्था किंवा आय. आय. टी. ( इंडियन इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी ), बंगलोरची इंडियन इन्स्टिटयूट ऑफ सायन्स, तसेच मुंबईची टाटा इन्स्टिटयूट ऑफ फंडामेंटल रिसर्च, कलकत्त्याच्या साहा इन्स्टिटयूट ऑफ न्यूक्लिअर फिजिक्स व इंडियन ॲसोसिएशन फॉर द कल्टिव्हेशन ऑफ सायन्स आणि मद्रास विद्यापीठातील इन्स्टिटयूट ऑफ थीओरेटिकल फिजिक्स यांसारख्या प्रगत संशोधन करणाऱ्या थोड्या संस्था या भारतातील दहा संस्थांमध्येच वैज्ञानिक संशोधनाला प्रोत्साहन देण्यात येते.

## नियतकालिके वाचून संशोधनविषयक प्रश्नांची निवड

वैयक्तिक पातळीवर स्वत: वैज्ञानिक ठरावीक प्रश्नांविषयीचे प्रयोग करतात. उदाहरणार्थ, घन पदार्थाच्या डेबाय-तापमानाचा अंदाज करणे किंवा कमी तापमानाला विशिष्ट उष्णता मोजणे. परस्परांशी निगडित असलेल्या प्रश्नांविषयीच्या संशोधनाचा सामाईक कार्यक्रम शास्त्रज्ञांच्या गटाने हाती घेतलेला असल्यास अशा प्रश्नांच्या निवडीसाठी लावण्यात येणाऱ्या सर्वसाधारण कसोटचा ह्या पर्यायाने गटाच्या सामाईक कसोटचा होतात. असे सामाईक कार्यक्रम हे नेहमीच परस्परांमध्ये मनमोकळी चर्चा करून व सर्वांनी मिळून घेतलेल्या निर्णयाचा परिपाक असतातच, असे

---

* 'न्यू क्वेस्ट' ( जाने.-फेब्रु. १९९० ) मधील व्ही. शिव व जे. बंडोपाध्याय यांच्या 'द लार्ज अँड फ्रॅगाइल कम्युनिटी ऑफ सायंटिस्ट्स इन इंडिया' या लेखाचा स्वैर अनुवाद.








नाही. प्रश्नांची निवड करताना लावण्यात येणाऱ्या कसोटचा आणि ते सोडविण्यासाठी वापरावयाची साधने व तंत्रे विशेषज्ञ सहकारीवर्गाबरोबर शास्त्रज्ञ व्यक्तिगत पातळीवर शिकत असतो व माहीत करून घेतो. या शिक्षणाचा मोठा भाग मूक स्वरूपाचा असतो. याचा अर्थ वैज्ञानिक निवडी या विज्ञानविषयक संशोधनकार्य करण्याची प्रक्रिया चालू असताना संपादन (आत्मसात) केल्या जातात. वैज्ञानिक संशोधनाच्या कामात प्रत्यक्ष सहभागी होणे म्हणजे 'वैज्ञानिक कार्य करणे' होय. वैज्ञानिक बाबींविषयी सहकारी वैज्ञानिकांबरोबर अनौपचारिक चर्चा करणे हे या प्रक्रियेचे महत्त्वाचे अंग असते. ज्ञानपत्रिका वाचणे, बैठकांमध्ये सहभागी होणे तसेच शोधनिबंध व अहवाल प्रसिद्ध करणे हे या कामाचे अन्य घटक होत.[६] ही सर्व कामे केल्यानेच संशोधनाचे प्रश्न निवडताना वापरावयाच्या कसोटचांची अधिक सखोल, अधिक चांगली जाण संपादिता येते. म्हणजे इतर शास्त्रज्ञांबरोबर विविध मार्गांनी पूर्णपणे संपर्क न राखणाऱ्या शास्त्रज्ञांना या सर्व कसोटचांवर पुरेसे प्रभुत्व मिळविता येणार नाही. आणि वैज्ञानिक दृष्टीने महत्त्वाचे असलेले व आपल्या आवाक्यातील म्हणजे उपलब्ध साधनसंपत्ती व कुशलता यांच्या द्वारे सोडविता येण्यासारखे प्रश्न निवडायचे झाल्यास या कसोटचा वापरायची गरज असते.

व्ही. शिव आणि जे. बंडोपाध्याय यांनी भारतातील अग्रगण्य वैज्ञानिक संस्थांमधील शास्त्रज्ञ कोणकोणत्या पद्धतींनी संशोधन करतात याची पाहणी केली. तेव्हा त्यांच्यामध्ये पुरेशा प्रमाणात परस्परसंपर्क राखला जात नसल्याचे त्यांना दिसून आले. त्यांनी ही पाहणी जाणूनबुजून पुढील क्षेत्रांतील संशोधनापुरतीच मर्यादित ठेवली होती : मूलकण (द्रव्याचे मूलभूत मानले गेलेले कण) भौतिकी, घन अवस्था भौतिकी, भौतिकीय धातुविज्ञान आणि सामग्रीविज्ञान (मटिरियल सायन्स) ही ती क्षेत्रे होत. तसेच त्यांनी आपला हा अभ्यास या क्षेत्रांमधील सर्वांत प्रगत अध्यापनाच्या व संशोधनाच्या वरील दहा केंद्रांपुरताच मर्यादित ठेवला होता. कारण ही केंद्रेच भारतातील या क्षेत्रांतील संशोधनाची दिशा ठरवीत असतात.[७] यावरून त्यांना असे दिसून आले की, विशेषकरून डॉक्टरेट पदवीसाठी लिहावयाच्या प्रबंधाचा विषय (प्रश्न) निवडताना पुष्कळदा ज्ञानपत्रिकांचा आधार घेण्यात येतो. एका मूलकण भौतिकीविदाने तसे नमूदही केले. तो म्हणाला : "(माझा) प्रबंधाचा विषय मला ज्ञानपत्रिकांच्या वाचनातून सुचला. एका विशिष्ट शोधनिबंधामुळे विशिष्ट प्रकारच्या प्रयोगांचे विश्लेषण आपण करू शकू अशी जाणीव निर्माण झाली." एक सामग्रीवैज्ञानिक म्हणाला : "विज्ञानविषयक साहित्य वाचल्यामुळे मुळात माझी आवड निश्चित झाली. लोकांनी त्या वेळी या क्षेत्रातील संशोधनकार्यास सुरुवात केली होती; यावर काहींनी शोधनिबंध लिहिले होते व १९६७–६८ दरम्यान असे १०–१५ निबंध प्रसिद्धही झाले होते." एका घन अवस्था भौतिकीविदाने आपल्याला नवीन प्रश्नाची गोडी अशाच तऱ्हेने लागल्याचे सांगितले. तो म्हणाला : "एका जपानी सहकाऱ्याचा शोधनिबंध माझ्या वाचनात आला व त्यामुळे माझ्या संशोधनाला एक नवी दिशा मिळाली." विषयाची निवड ठरविणारे हे घटक यांच्यापुरतेच मर्यादित होते असे दिसत नाही. छापील गोष्टींवर अवलंबून राहण्याची भारतीय वैज्ञानिकांची ही वृत्ती काहीशी सार्वत्रिक आहे. एका दुसऱ्या वैज्ञानिकाने ही वृत्ती अधिक व्यापक प्रमाणात असल्याचे सांगितले. कोणत्या प्रश्नाविषयी संशोधन करावयाचे हे ठरविताना भारतीय शास्त्रज्ञ कोणता मार्ग अनुसरतात या प्रश्नावर या वैज्ञानिकाने असे उत्तर दिले होते : "आम्ही जे काही करतो ते करताना आमचे डोळे नेहमीच 'पाश्चात्यांकडे' लागलेले असतात व ते काय करीत आहेत ते आम्ही पाहात असतो. समजा, मला एखादा नवीन विषय हवा आहे. मग कोणते नवनवीन विषय पुढे येत आहेत याचा शोध घेण्यासाठी मी ज्ञानपत्रिकांचे नवीन अंक चाळतो. अचानकपणे पृष्ठ-भौतिकी हा विषय पुढे येत असल्याचे दिसते आणि मी त्यावर संशोधन करायला सुरुवात करतो..."

आणखी एकाच्या पुढील उद्गारांमध्येही हीच वृत्ती दिसून येते : "(सध्या) कोणत्या तऱ्हेच्या गोष्टींवर संशोधन करण्यात येत आहे हे शोधून काढण्यासाठी 'द फिजिकल रिव्ह्यू', 'द जर्नल ऑफ फिजिक्स' इत्यादी नियतकालिकांतील लेख मी वाचतो व मग त्यानुसार प्रकल्पाची आखणी करतो. कारण तुम्ही तसे केले नाही तर तुम्हाला येथे नोकरी (काम) मिळत नाही. अशा ज्ञानपत्रिकांतून तुम्हाला लेख प्रसिद्ध करणे भाग असते. त्यामुळे पाश्चात्य शास्त्रज्ञ जे काही करीत असतात त्याप्रमाणेच काही तरी करणे तुम्हाला

आवश्यक असते. तुम्हाला जर 'द फिजिकल रिव्ह्यू'-मध्ये काही छापून आणायचे असेल, तर तुम्ही 'द फिजिकल रिव्ह्यू' वाचायची धडपड नक्कीच कराल. आणि त्यात प्रसिद्ध होणाऱ्या संशोधनासारखे कोठले तरी संशोधन करण्याचा प्रयत्न कराल. अन्यथा तुमचे संशोधन त्यात छापून येणार नाही."

संशोधनाचे विषय शोधून काढण्याच्या या पद्धतीमुळे वैज्ञानिकांच्या कल्पनेचा आवाका सीमित होतो. मग भारतीय वैज्ञानिक अशा मर्यादित कल्पनां-मध्येच रस घेतात व त्यांतच रमतात. आणि या कल्पना नियतकालिकांमध्ये अधिकृतपणे छापून आणता येऊ शकतात. भारतीय संस्थांमध्ये उपलब्ध होऊ शकणाऱ्या विज्ञानविषयक प्रमुख ज्ञानपत्रिका मुख्यत्वे पाश्चात्त्य देशांतून आलेल्या असतात. त्यामुळे तेथील भौतिकीविद ज्या प्रश्नांचा अभ्यास करीत आहेत, त्या विषयांवरचे संशोधन आपणही केलेच पाहिजे असे भारतीय शास्त्रज्ञांना बळेच वाटू लागते. अशा तऱ्हेने निवडलेले विषय हे पुष्कळदा अनुभवलेले नसतात.

## उपलब्ध साधनसामग्रीनुसार निवडण्यात येणारे विषय

भारतीय शास्त्रज्ञ आपले संशोधनाचे विषय (प्रश्न) कसे निवडतात, हे बाजूला ठेवले; तरी बऱ्याच वेळा त्यांना अन्य बाबींमुळे उद्भवणाऱ्या बाह्य निर्बंधांना सामोरे जावे लागते. संशोधनासाठी उपलब्ध असलेल्या मर्यादित साधनसामग्रीमुळे ( सुविधांमुळे ) त्यांच्या कामात अडचणी येतात. उदाहरणार्थ, एका विशिष्ट प्रश्नावरचे संशोधन करण्याचा निर्णय कसा घेतला, असे विचारल्यावर एक भौतिकीविद म्हणाला : "घन अवस्था भौतिकी या विषयातील संशोधन करण्यात मला रस होता. परंतु त्या वेळेस माझ्या विभागात द्रवरूप हीलियम (वायू) उपलब्ध नव्हता. म्हणून मी माझी आवड किंचित बदलण्याचा निर्णय घेतला." एका सामग्रीवैज्ञानिकाला अशा अडचणींची आगाऊ कल्पना होती. त्यामुळे त्याने आपला डॉक्टरेट पदवी-साठीचा विषय निवडताना उपलब्ध सुविधांद्वारे त्यावर संशोधन करता येऊ शकेल, हे पाहिले होते. तो म्हणाला :

"येथे संशोधन करणे ही अतिशय अवघड गोष्ट असल्याचे तेव्हा मला सांगण्यात आले होते. कारण आम्ही आखलेले संशोधनाचे कार्यक्रम अतिशय महत्त्वाकांक्षी असतात. आणि त्यासाठी आवश्यक असलेली तांत्रिक सुविधा उपलब्ध नसते. मी संशोधना-साठी इलेक्ट्रॉन सूक्ष्मदर्शकाच्या शास्त्रातील विषय निवडला असता. परंतु यावर संशोधन करणे तेवढे सोपे नाही असे पूर्वानुभवांवरून दिसून आले. उलट, मी निवडलेला धातुनिष्कर्षणाशी संबंधित विषय संशोधनाच्या दृष्टीने नक्कीच शक्य कोटीतील वाटला. कारण येथील साधने व सुविधा वापरून त्याचे संशोधन करणे शक्य होते. आणि विश्वास ठेवा अगर ठेवू नका माझ्या प्रायोगिक पूर्वतयारीला १५० रुपयांहून कमी खर्च आला. ही बहुतेक सामग्री मीच खरिदली होती. कारण मला लाल फितीत गुरफटायचे नव्हते."

अशा तऱ्हेने संशोधनासाठी विषय निवडताना भारतीय शास्त्रज्ञांवर काही बंधने पडतात आणि गुंता-गुंतीची साधने उपलब्ध नसणे हे याचे एक कारण असू शकते. पाश्चात्त्य संशोधन कार्यक्रमांतून पुढे आलेले प्रश्न सोडवावयाचे झाल्यास त्यासाठी त्यांच्या प्रमाणभूत मानकांनुसार बनविलेली अशी साधने आवश्यक ठरतात. अशी अधिक गुंतागुंतीची उपकरणे उपलब्ध असली, तरी ती वापरण्यासाठी भौतिकीविदांना तंत्रज्ञांची मदत घ्यावी लागते आणि असे तंत्रज्ञ नसल्यास ती उपकरणे वापरता येत नाहीत. या संदर्भात एक सामग्रीवैज्ञानिक म्हणाला :

"भारतातील चांगल्या प्रयोगशाळांमधून पुष्कळ चांगली साधने, सुविधा आहेत. परंतु त्यांचे सुटे भाग आपल्यापाशी नाहीत. ही उपकरणे बनविणाऱ्या कंपनीच्या भारतातील एजंटांना सुटचा भागांचा साठा ठेवण्याची परवानगी नसते. सुटचा भागांची आवश्यकता असली, तर त्यासाठी आयात परवाना वगैरेंची गरज पडते. सर्व व्यवहार पूर्ण व्हायला मग वर्षही लागते. सध्याचे संशोधन एवढे स्पर्धात्मक झालेले आहे की, ते एक वर्ष थांबविता येऊ शकेल का ?"

एका प्रयोगशाळेत दहा वर्षांपूर्वीच स्फटिक वाढ-विण्याच्या उत्कृष्ट पद्धती विकसित करण्यात आल्या होत्या. मात्र नंतर तेथील संशोधनाची पीछेहाट झाली. कारण तेथे योग्य प्रकारची साधनसामग्री उपलब्ध नव्हती. तेथील एक वैज्ञानिक म्हणाला :

"१९६६ साली आमच्यापाशी एका संयुगाचे काही स्फटिक होते. भारताबाहेरील संशोधकांच्या २-३ तुकडयांनाही या संयुगाचे मोठे स्फटिक तयार करण्यात रस होता. मात्र हे स्फटिक वाढविण्याची बहुधा








सर्वोत्कृष्ट पद्धती आम्ही तयार केल्याचे उघड झाले होते. कारण इतर संशोधक या संयुगाचे ०·१ मिलिमीटर आकारमानाचेच स्फटिक बनवू शकत होते; तर आम्ही १ मिलिमीटर आकारमानाचे स्फटिक तयार करत होतो. तसेच क्ष-किरण परीक्षणाने आमच्या स्फटिकांचे आकृतिबंधही अधिक चांगले असल्याचे स्पष्ट झाले होते... ... तथापि या क्षेत्रातील शर्यत आम्ही हरलो कारण कमी तापमानाला वापरता येईल अशी क्ष-किरण विवर्तनाची सोय भारतात उपलब्ध नव्हती... ... ..."

समजा, एखाद्या महत्त्वाच्या प्रश्नावरील संशोधन हाती घेतले आणि त्याकरिता अतिशय बिनचूकपणे कार्य करण्याची आवश्यकता असली, तर तशी अगदी काटेकोर साधने नसल्यास वैज्ञानिक पंगू बनतो. शिवाय अशी अचूकता एखाद्या टप्प्याच्या बाबतीत गाठता येणे शक्य असले, तरी अचूकतेची सर्वोत्कृष्ट पातळी टिकवून ठेवण्यासाठी आवश्यक असणारी आधारभूत चौकट येथे उभारली गेलेली नाही.

दुसऱ्या एका भौतिकीविदाचे त्याच्या स्वतःच्या संस्थेतील साधनसामग्रीच्या युक्तायुक्ततेविषयीचे मतही असेच आहे. तो म्हणतो :

"खुद्द आमच्या विभागातील सर्वच्या सर्व म्हणजे १० केंद्रोत्सारक यंत्रे बिघडून पडलेली आढळतील. जर भावी काळासाठी निधी उपलब्ध झालाच, तर त्यातून आणखी एक केंद्रोत्सारक यंत्र विकत घेण्यात येईल. कारण इतर बिघडलेली दहा यंत्रे दुरुस्त करून घेण्याची शक्यताच निर्माण होत नाही."

एका घन अवस्था भौतिकीविदानेही हाच मुद्दा मांडला. त्याच्या मते साधनसामग्रीच्या खरेदीचा हेतू ती वापरता येऊ शकेल असाच असेल असे ठामपणे सांगता येत नाही. म्हणून तो म्हणतो :

"साधनसामग्रीत वाढ झालेली आहे असे मला वाटत नाही. एखादे परदेशी उपकरण खरेदी केले म्हणजे सुविधा उपलब्ध होतेच असे नाही. समजा, त्या गुंतागुंतीच्या उपकरणात काही गडबड झालीच, तर ते परत प्रत्यक्ष चालू करण्यासाठी लागणारे तांत्रिक कौशल्य आपल्या देशात उपलब्ध नसते. या यंत्रांची उभारणी आपल्या देशात व गरजेनुसार केलेली नसते. म्हणून आपल्या मातीत तयार न झालेले एखादे यंत्र बाहेरून आणून येथे स्थापणे म्हणजे येथील साधनसामग्रीत झालेली सुधारणा वा पडलेली भर म्हणता येणार नाही. येथे अशी अनेक यंत्रे बेकार पडून असल्याचे तुम्हाला आढळेल. कारण ती हाताळावीत व वापरावीत कशी हेच आम्हाला माहीत नाही; कारण आम्ही मुळापासून त्यांची बांधणी केलेली नसते. थोडक्यात अशी यंत्रे बनविण्यासाठी आवश्यक असणारी तंत्रविद्या भारतात विकसित होईपर्यंत काहीही करता येणे शक्य नाही. तुम्ही जपानमध्ये जा. जपानने तंत्रविद्येमध्ये कसा विकास घडवून आणला आहे ते पहा. एके काळी जपानला लागणारी सर्व यंत्रोपकरणे आयात करावी लागत. तेथे आयात केलेले यंत्र पूर्णपणे खोलण्यात येई व त्याचे तंत्र जाणून घेऊन त्याहून अधिक सरस यंत्र बनविण्यात येई. अशा प्रकारे शिकायचे असते. लहान मुलेही अशीच शिकतात; मुले खेळणी, वस्तू मोडतात आणि मोडके भाग जुळवून वस्तू बनविण्याचे वा रचण्याचे प्रयत्न करतात. तो त्यांच्या शिक्षणाचा मार्ग असतो. आणि यशाला जवळचा मार्ग नसतो."

अपुरी साधने व त्यांच्या देखभालीची अपुरी व्यवस्था तसेच संशोधनासाठी विषयांची करण्यात येणारी पुस्तकी निवड हे भारतीय संशोधनापुढील पेच आहेत. विज्ञानाबरोबर निकटचे संबंध नसल्याने हे पेच निर्माण झालेले आहेत. विज्ञानाशी सख्य राखण्याचा अर्थ आहे 'कृतीतून शिक्षण' हा ! जेव्हा संशोधनाचे विषय कसोटचा वापरून व आवडीनुसार निवडले जातात तेव्हा वैज्ञानिकाची कल्पना व ती साध्य करण्याची त्याची कुवत यांच्यात विशेष अंतर पडत नाही. सरावातून आलेला अनुभव व निवडलेल्या प्रश्नाशी निगडित असलेल्या विषयांवर संशोधन करीत असलेल्या अन्य वैज्ञानिकांबरोबर वरचेवर होणाऱ्या चर्चा यांद्वारे वरील कसोटचा निश्चित झालेल्या असाव्यात आणि आवडही यातून निर्माण झालेली असावी लागते. अशा प्रकारचे प्रत्यक्ष संशोधन करीत असलेल्या शास्त्रज्ञांबरोबर होणाऱ्या चर्चा व पत्रव्यवहार यांचा प्रश्नाची निवड करताना निश्चित उपयोग होतो व मार्गदर्शनही मिळते. परिणामी उचित व व्यवहार्य विषयच संशोधनासाठी निवडणे शक्य होते. दडपणाविना अनौपचारिक रीतीने निवडलेल्या अशा विषयांतील संशोधन यशस्वी ठरण्याची शक्यता अधिक असते. म्हणून चांगल्या संशोधनासाठी जशी शिकत राहण्याची गरज असते त्याचप्रमाणे

अनुक्रमणिका

संशोधन व्यवहार्य ठरेल की नाही, हेही जाणून घेणे महत्त्वाचे असते.

पाश्चात्त्य व भारतीय शास्त्रज्ञांच्या संशोधनाचे विषय सारखे असले, तरी विषयांची निवड करण्याच्या त्यांच्या तऱ्हा सारख्या नसतात. आपल्या संशोधनकार्याचा महत्त्वाचा काळ अमेरिकेत व्यतीत केलेल्या एका प्रमुख भारतीय मूलकण भौतिकीविदाने भारतात चांगले वैज्ञानिक संशोधन करताना येणाऱ्या अडचणी स्पष्ट करताना प्रशिक्षणातील तफावत हे मूलभूत कारण दिले आहे. तो म्हणाला :

"प्रशिक्षणाच्या सुरुवातीच्या काळात अमेरिकन शास्त्रज्ञ हे भारतीय शास्त्रज्ञांहून फार वेगळे ठरतात. ते बऱ्याच आधी शास्त्रज्ञ झालेले असतात. वैज्ञानिक पेशा म्हणजे काय याची जाण त्यांना या पेशाला सुरुवात करतानाच आलेली असते. माझे समकालीन अमेरिकन सहकारी मी शास्त्रज्ञ बनण्याआधी पुष्कळ काळापासून शास्त्रज्ञ होते, असे मला वाटते. पीएच. डी. पदवी घेतल्यानंतर कित्येक वर्षांपर्यंत संशोधन म्हणजे नेमके काय हे मला खरोखरच माहीत नव्हते. अर्थात कोठल्या तरी अन्य अर्थाने मी संशोधन केले होते. माझे प्राध्यापक हे सद्गृहस्थ होते व त्यांनी मला चांगले समजूनही घेतले. आम्ही पुष्कळ लेखही प्रसिद्ध केले. परंतु पुरेसे वैज्ञानिक संशोधन करेपर्यंत मला वैज्ञानिक कार्य करण्याचा अनुभव खरोखरच आलेला नव्हता."

भारतातील वैज्ञानिक व्यवहाराला एक पूर्वापार संदर्भ असतो. त्यामुळे भारतीय शास्त्रज्ञाचे कार्य अडथळ्यांसह सुरू होते व चालू राहते. या अडचणींनी निराश झालेल्या एका घन अवस्था भौतिकीविदाचे म्हणणे असे होते :

"भारतीय शास्त्रज्ञांना योग्य प्रकारच्या सुविधांशिवाय आंतरराष्ट्रीय पातळीवर इतर शास्त्रज्ञांशी स्पर्धा करावी लागते, ही अत्यंत अन्यायकारक बाब आहे." भारतीय शास्त्रज्ञांनी महत्त्वाचे शोध कधीच लावले नाहीत, असे म्हणता येणार नाही. ते तसे कर्तृत्ववान असल्याचे १९३०–५० दरम्यानच्या त्यांच्या संशोधनकार्यावरून स्पष्ट झाले होतेच. संशोधनाच्या सुविधा पुष्कळच कमी असतानाही या काळात सी. व्ही. रामन, सत्येंद्रनाथ बोस, मेघनाद साहा, एम. एस. कृष्णन व अन्य शास्त्रज्ञांनी मोलाचे संशोधन केले, हे नक्की! संशोधनासाठी प्रश्नांची निवड करताना त्यांनाही अडचणी आल्या होत्या; हे प्रश्न पाश्चात्त्यांकडूनच आलेले होते. त्यांची निवड करताना त्यांना ज्ञानपत्रिका व नियतकालिकांचाच आश्रय घ्यावा लागला होता आणि तेथील शास्त्रज्ञांबरोबर त्यांचा वैयक्तिक संपर्कही बेताचाच होता. अशा तऱ्हेने आताच्याच अडचणी त्यांच्याही पुढे होत्या. परंतु हे असामान्य शास्त्रज्ञ असल्याने इतरांना दुर्लंघ्य वाटणाऱ्या अडचणींवरही त्यांनी मात केली. अर्थात तेव्हाच्या अडचणी आताएवढ्या गंभीर नव्हत्या. कारण अगदी छापील रूपात पाश्चात्त्यांकडून आलेल्या कल्पना आणि त्यांच्यावर भारतात संशोधन करण्याची व्यवहार्य शक्यता यांमध्ये तेवढी तफावत नव्हती. त्यानंतर मात्र ही दरी वाढत गेलेली दिसते. रामन यांच्या कलकत्त्यातील प्रयोगशाळेत काम केल्यावर परदेशी गेलेल्या शास्त्रज्ञाचे या बाबतीतील मत असे आहे :

"पेन्सिल्व्हानियात आम्ही वापरीत असलेले उपकरण हे कलकत्त्यातील उपकरणासारखेच होते. बर्कली येथे वजने घेण्यासाठी मी वापरीत होतो ते तराजू हे कलकत्त्यातील तराजूंपेक्षा वाईट होते. येथे आमच्याजवळ चांगले जर्मन तराजू होते. परंतु आता जर सुविधांच्या बाबतीत या दोन ठिकाणांची तुलना केली, तर येथील सामग्रीचा दर्जा तेथल्या मानाने दुसऱ्या वा तिसऱ्या प्रतीचाही आढळेल."

## परदेशी शास्त्रज्ञांबरोबरचे संबंध

हल्ली भारतीय शास्त्रज्ञापुढे असणाऱ्या अडीअडचणी, त्यांना जाणवणाऱ्या उणिवा यांना अखेरीस पुढील वस्तुस्थिती कारणीभूत आहे : येथील संशोधनाची सुरुवातच अव्यवहार्य वा अनुचित गोष्टींपासून होते. सर्वच भारतीय शास्त्रज्ञांचा पाश्चात्त्य शास्त्रज्ञांशी संबंध येत नाही असे म्हणता येणार नाही. कारण यांपैकी पुष्कळांचे अध्ययन व संशोधनही परदेशांत झालेले असते. वरील दोघांनी या पाहणीत ज्या भारतीय शास्त्रज्ञांच्या मुलाखती घेतल्या त्यांपैकी १९ जणांनी डॉक्टरेट पदवीसाठी परदेशांतच संशोधन केले होते; ४२ जणांनी याच्यापुढचे संशोधन परदेशी केले होते तर ३९ जणांनी परदेशी अध्यापन करताना संशोधन केले होते. अर्थात काहींनी यांपैकी दोन वा तीनही प्रकारचे संशोधन तेथे केले होते.

अशा प्रकारे परदेशी जाणाऱ्यांची संख्या मोठी असली, तरी त्यांना या अनुभवाचा उपयोग येथे सुरु-

वातीला झाला नाही. डॉक्टरेट पदवीच्या अभ्यासासाठी जाणारे बहुतेक भारतीय तरुण शास्त्रज्ञ आर्थिक बाबतीत मदत व्हावी म्हणून एखाद्या प्रकल्पात सामील होतात. अशा तऱ्हेने वैज्ञानिक परिपक्वता येण्याआधीच अथवा संशोधनासाठी प्रश्न निवडीचा पुरेसा अनुभव येण्याच्या बऱ्याच आधी ते स्वतः न निवडलेल्या विषयाच्या संशोधन प्रकल्पात सहभागी होतात. यामुळे आपल्या आवडीच्या क्षेत्रातील विषय संशोधनासाठी कसे निवडावेत याच्या कसोटचा त्यांना अवगत होत नाहीत. जास्तीत जास्त निवडून दिलेल्या एखाद्या विशिष्ट विषयावरचे संशोधन कसे करावे एवढेच त्यांना शिकायला मिळते. डॉक्टरेटनंतरच्या संशोधनासाठी अमेरिकेला गेलेल्या एका संशोधकाने त्याला तेथे जे जे करायला सांगण्यात आले ते ते त्याने केल्याचे प्रामाणिकपणे सांगितले. आधीच्या संशोधनातून निर्माण झालेल्या एखाद्या विशिष्ट वैज्ञानिक हेतूच्या पूर्तीसाठी काही तो अमेरिकेला गेला नव्हता. संशोधनासाठी कोठले विषय निवडायला हवेत याच्या योग्य कसोटचा परदेशातील प्रशिक्षणात आत्मसात करणारे काही शास्त्रज्ञ आहेत. मात्र त्यांना येथील वैज्ञानिक संशोधनाविषयीच्या परिस्थितीचे भान नसते. त्यामुळे तेही येथे फायदेशीर ठरू शकतील असे संशोधन प्रकल्प निवडून हाती घेण्यात यशस्वी ठरतातच असे नाही. एका भारतीय वरिष्ठ वैज्ञानिकाने परदेशातील प्रशिक्षणाचा आढावा घेतला असून याचा येथील संशोधनावर काय परिणाम झाला याचाही मागोवा त्याने घेतला. तो म्हणतो :

" स्वातंत्र्य मिळाल्यावर पंडित नेहरू व महालनोबीस यांना भारताने विज्ञानात लक्ष घालायला हवे, गुंतवणूक करायला हवी असे वाटत होते. त्यासाठी तरुण भारतीय शास्त्रज्ञांना परदेशी पाठविण्यात आले. मात्र या तरुणांना भारतातील वैज्ञानिक संशोधनाविषयीची परिस्थिती कशी आहे, याची काहीच कल्पना नव्हती. संशोधन करण्याच्या दृष्टीने त्यांचे प्रशिक्षण झालेले नव्हते. एक पीएच. डी. पदवी संपादन करण्याच्या दृष्टीने आवश्यक तेवढेच प्रशिक्षण त्यांना परदेशात मिळाले. त्यांनी भारतात कधीही संशोधनकार्य केलेले नव्हते. त्यामुळे येथे परतल्यावर त्यांना भारतातील परिस्थितीशी जुळवून घेणे फार अवघड गेले. यांपैकी प्रत्येकाने परदेशी वापरलेल्या सुविधा मागण्यास सुरुवात केली. त्या येथे मिळणे शक्य नव्हते. मग ते या कामापासून दूर गेले अथवा येथेच राहून त्यांनी आपले पीएच. डी. साठीचे संशोधन पुढे चालू ठेवले. यामुळे येथील संशोधनात अयोग्य विषयांचा भरणा सुरू झाला. अशा तऱ्हेने आपली प्रत्येक विधायक गोष्ट विनाशक ठरत असल्याचे दिसून आले. "

## गाभ्याशी टिकून राहण्याची धडपड व काठाकडे फेकले जाणे

भारतातील सर्व वैज्ञानिकांना सुरुवातीला साऱ्याच अडचणींना सामोरे जावे लागले. मात्र असे असूनही काही थोड्या शास्त्रज्ञांना अन्य सहकाऱ्यांहून अधिक वरच्या पातळीवरची मान्यता मिळविण्यात यश मिळाले आहे. पाश्चात्त्य देशांतील अग्रगण्य संशोधन केंद्रांशी अधिक प्रमाणात व्यक्तिगत संपर्क साधण्यात या अधिक यशस्वी शास्त्रज्ञांना यश आले, हे त्यांचे वैशिष्टच सांगता येईल. यांपैकी एका मूलकण भौतिकीविदाला या शैक्षणिक संपर्काविषयी विचारले असता तो म्हणाला :

" बहुधा असा संपर्क व्यक्तिगत विचारविनिमयामधून निर्माण होतो, अगदी प्रसंगविशेषीच ज्ञानपत्रिकांद्वारे असा संपर्क साधला जातो. माझ्या संशोधनाचा महत्त्वाचा काळ असेच संशोधन चालू असलेल्या ठिकाणी गेला, हे याचे कारण आहे. भारतात आल्यापासून मी वर्षातून एक वेळ तिकडे जाऊन येतो. यातून रुचतील अशा नवीन गोष्टी समजतात... ... माझ्या येथील कामाशी तेथील काम चांगले जुळणारे असते. उदाहरणार्थ, या वेळी मी खास करून माझ्याच क्षेत्रात काम करीत असलेल्या वैज्ञानिकांबरोबर विचारविनिमय करायला गेलो होतो. हार्व्हर्ड विद्यापीठ व मॅसॅच्युसेट इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी येथे असे पुष्कळ संशोधक आहेत. त्यांच्या निमंत्रणावरून मी हाती घेतलेल्या संशोधनाविषयी चर्चा करण्यासाठीच तिकडे गेलो होतो. अशा भेटीतून संशोधनाचे भावी विषयही समजतात व त्यांवर चिंतन-मनन करण्यासाठी वेळ मिळतो. तुम्ही जे कार्य करीत आहात तसेच काम करणारी मंडळी जर तुम्हाला एखाद्या ठिकाणी भेटली, तर तुम्ही तेथे परत आवर्जून जाता... ... "

एका घन अवस्था भौतिकीविदाच्या मते व्यक्तिगत संबंध व ते निर्माण करण्याची नितांत आवश्यकता असते. तो म्हणाला :

अनुक्रमणिका

"ज्ञानपत्रिका अथवा छापील लेखांची प्रसिद्धिपूर्व देवाणघेवाण करून अशा तऱ्हेचे संबंध निर्माण होतील का ?

"अर्थात या रीतीनेही संपर्क साधणे शक्य असते. मात्र या बाबतीत पुढील अडचण असते. असे लेख, पत्रे वगैरे यांना एखादे वर्ष अर्थ असतो. प्रत्यक्ष त्या व्यक्तीची गाठभेट घेतली नाही, तर अनौपचारिकता कमी होते. अशा तऱ्हेने तुम्ही १–२ वर्षे प्रत्यक्ष संपर्कात आलाच नाहीत, तर तुमच्या पत्रांना शिष्टाचाराची कळा येते. म्हणजे गंभीरपणे विचारविनिमय करणे अवघड होत जाते. परिषदेमधून अधूनमधून पडणाऱ्या गाठीभेटीसुद्धा या दृष्टीने महत्त्वाच्या ठरतात. कारण त्यामुळे तुम्ही प्रत्यक्ष भेटता व औपचारिकता कमी होते. केवळ परिषदेत हजेरी लावण्यासाठी मी कधी जात नाही. सध्याची परिषदांची तऱ्हा पाहता तेथे केवळ ४–५ दिवसांतच शेकडो शोधनिबंध वाचले जातात. यातून तुमच्या पदरात (गाठीभेटीशिवाय) काहीच पडत नाही, असे मी ठामपणे म्हणू शकतो. मात्र एखाद्या विशिष्ट व्यक्तीला भेटून तिच्याशी चर्चा करण्याची तुम्हाला मनापासून इच्छा असेल, तर ती संधी अशा परिषदेने साधता येणे शक्य असते. आणि हा परिषदेचा एकमेव उपयुक्त भाग म्हणता येईल. अन्यथा आपल्याच संशोधन विषयावरचे कार्य चालू असलेल्या माहितीच्या प्रयोगशाळेला जाणे मला अधिक बरे वाटते. आणि तुम्हाला जर एकत्र काम करायचे असेल, तर अशा भेटी सर्वोत्तम ठरतात. ब्रिटिश कोलंबियाची माझी दुसरी भेट अतिशय उपयुक्त ठरली. कारण मला तेथील प्रयोगशाळा, तिच्यातील सुविधा व कर्मचारी यांची चांगली माहिती होती. कधी कधी मी तेथे वर्षाहून अधिक काळाने परत जातो. तेव्हा मी इतका काळ नव्हतो याची तेथील लोकांना जाणीवही होत नसावी. अशा प्रकारचे संबंध निर्माण होणे गरजेचे असते."

मात्र अशा व्यक्तिगत संबंधांवर भर देणारे शास्त्रज्ञ कमीच आढळतात. ज्यांनी असे संबंध प्रत्यक्ष निर्माण केले होते, त्यांनाच त्यांचे महत्त्व उमगले होते. असे अधिक यशस्वी शास्त्रज्ञ हे संशोधनाचे योग्य प्रश्न निवडण्याच्या बाबतीतही अधिक संवेदनशील असलेले आढळतात.

"संशोधन म्हणजे एखादा विषय–उचित प्रश्न–कसा निवडावा याविषयी सावधानता बाळगणे होय. केवळ उत्तम प्रश्न एवढेच पुरेसे नसते. पुष्कळ लोक अतिशय चांगल्या मानलेल्या प्रश्नावरचे संशोधन हाती घेतात; पण कोणीही त्याकडे लक्ष देत नाही. ते अतिशय क्षुल्लक बाबीही अतिशय उत्तम रीतीने मापतात व त्याकडे कोणीही ढुंकून पाहात नाही. प्रश्न निवडताना अधिकाधिक उत्साह असतो. मात्र उचित निवड कशी करावी हे समजून घेण्यासाठी निदान भारतात तरी दीर्घ काळ लागतो. इतरत्र हा कालावधी कमी असतो, असे मला वाटते. असंख्य अडथळे पार करण्यातच दमछाक होऊन बहुसंख्य तरुण भारतीय शास्त्रज्ञ संशोधनात अपेशी ठरतात. संशोधन करण्याची जाण ( वा अनुभव ) इतकी उशिरा येते की, इतर अडीअडचणींमुळे त्या बापड्याचा उत्साह पार संपून जातो."

महत्त्वाच्या पाश्चात्त्य संशोधकांबरोबर नियमित संपर्क राखणे आवश्यक असते. कारण झपाट्याने प्रगत होत असणाऱ्या विज्ञानाच्या एखाद्या ज्ञानशाखेतील संशोधनकार्य त्यावर अवलंबून असते. अतिशय कष्टाळू व ब्रिटनमधील विद्यापीठाशी दीर्घ काळ संबंध असणाऱ्या एका भारतीय वैज्ञानिकाने या म्हणण्याला पुष्टी दिली. तो म्हणाला :

"या संपर्काचा मुख्य फायदा म्हणजे तेथे आधीच सुविधा उपलब्ध असतात. येथे अगदी संन्याशाच्या लग्नाला शेंडीपासून तयारीप्रमाणे शून्यापासून तयारी करावी लागते. येथे तुम्हाला तुमचा विभागही सांभाळावा लागतो. उलट, तेथे प्रयोगाच्या एखाद्या भागाचीच जुळवाजुळव तुम्हाला करावी लागते. उरलेल्या सोयी, तेथे आधीच उपलब्ध असतात, सर्व मूलभूत सुविधा तेथे असतात."

भारतात चांगली साधनसामग्रीच नव्हे तर तिची देखभाल करू शकणारा तंत्रज्ञही येथे असला, तरी ती सामग्रीच पाश्चात्त्य देशांतील सामग्रीच्या मानाने लवकरच मागस होते. हे स्पष्ट करण्यासाठी एका घन अवस्था भौतिकीविदाचा पुढील शेरा पुरेसा आहे :

"जोपर्यंत आपले कलकत्त्यातील प्रगत सायक्लोट्रॉन हे उपकरण उभारले जाईल, तोपर्यंत आघाडीवर असणाऱ्या कार्याच्या तुलनेने ते कालबाह्य झालेले असेल."

भारतातील संशोधन केंद्रांमधील पुष्कळ वैज्ञानिकांचे डॉक्टरेटचे वा त्यानंतरचे शिक्षण–प्रशिक्षण परदेशांत झालेले आहे. ते येथे परत येईपर्यंत व त्यांच्या

सवयीच्या सुविधा येथे उभारल्या जाईपर्यंत ही साधने व संशोधनाचे प्रश्नही कालबाह्य झालेले असतात. यासाठी व्यक्तिगत संबंध राखणे व आवश्यक साधने वापरणे आवश्यक असते. यांच्याविना भारतीय संशोधन पाश्चात्यांच्या तुलनेने काठावरचेच राहते; गाभ्या-पर्यंत जातच नाही.

याला पुढील दोन पर्याय आहेत : १) रासायनिक संघटन, तापमान वगैरेंसारख्या बदलणाऱ्या राशींची मूल्ये बदलून तशाच प्रकारच्या भौतिकीय संशोधन प्रणालींमधील जुळणारी मापने वा आकडेमोड यांसारखेच क्षुल्लक बदल करून संशोधन तेथेच थांबविणे. अथवा २) उपलब्ध निधीनुसार एका क्षेत्राकडून दुसऱ्या क्षेत्राकडे हवे तसे वळणे. अशा तऱ्हेने एक भारतीय वैज्ञानिक रशियन शिष्यवृत्ती मिळाल्याने धातूच्या निष्कर्षणाकडून ओतकामाच्या तंत्रविद्येकडे वळला आणि नंतर अमेरिकेत जाऊन आल्यावर त्याने मूलभूत संशोधन हाती घेतले.

अशा क्षेत्रबदलाची निरनिराळी कारणे असल्याचे आढळून आले. सदरची कारणे व त्यामुळे आपले क्षेत्र बदलणाऱ्या शास्त्रज्ञांची या पाहणीत आढळलेली संख्या पुढे दिली आहे : १) शिष्यवृत्ती मिळाल्याने परदेशी संशोधनाची संधी घेणे– २९; २) आंतरराष्ट्रीय परिषदेत भाग घेणे– ३; ३) परदेशी संस्थांना भेटी देणे– १४; ४) नवीन संशोधन क्षेत्राची प्रतिष्ठा मिळविणे– ६; ५) आपल्या पूर्वीच्या अध्ययनातून गोडी निर्माण होणे– १५; ६) प्रयोगांसाठी लागणारी साधने उपलब्ध असणे– ४; ७) सहकाऱ्यांशी संबंध येणे– ४ आणि ८) व्यावहारिक लाभासाठी वाव असणे– २.

अर्थात शिष्यवृत्ती परदेशातील असली, तरच अशा तऱ्हेने संशोधनाचे क्षेत्र बदलले जाते. भारतातील शिष्य-वृत्तीचे आकर्षण कमी असून त्यामागील कारणे अशी आहेत : रक्कम कमी असते; थोडक्या कालावधीच्या नियुक्तीमध्ये असुरक्षितता असते आणि येथे केलेल्या संशोधनाला मान्यता मिळण्याची शक्यता कमी असते. उलट, परदेशी शिष्यवृत्ती व भेटी यांच्यामुळे परदेशी वैज्ञानिकांशी व्यक्तिगत संबंध निर्माण होणे शक्य असते. या सर्व कारणांच्या एकत्रित प्रभावामुळे बहुसंख्य भारतीय शास्त्रज्ञ संशोधनाचे क्षेत्र बदलतात. भारतात परतल्यावर जे थोडे शास्त्रज्ञ परदेशी सहकाऱ्यांशी संपर्क ठेवण्यात यशस्वी होतात, त्यांचे येथील संशोधन अधिक फलदायी ठरते, असा अनुभव आहे.

तथापि बहुसंख्य भारतीय वैज्ञानिकांच्या बाबतीत त्यांच्या परदेशवारीमुळे निर्माण झालेल्या व्यक्तिगत संबंधांचा कायमचा ठसा राहात नाही. आपले संशोधनाचे क्षेत्र बदलण्याचा निर्णय ते पुष्कळदा मन मानेल तसा घेतात किंवा हा बदल अपघाताने होतो. म्हणजे मना-पासून असणारी बौद्धिक आवड अथवा पूर्वीच्या वैज्ञानिक रुचीला नवीन दिशा देणे ही अशा बदलामागील कारणे नसतात. परदेशाला अचानकपणे व थोडा वेळ वारंवार जात राहिल्याने या दिशाहीनतेत भरच पडते. अशा परदेशवाऱ्यांच्या टीकाकार असलेल्या एका शास्त्रज्ञाने या संदर्भात असे म्हटले होते :

"दर सहा महिन्यांनी आम्ही परदेशी जातो. परिणामी आमच्या मूलभूत कल्पना स्थिर होत नाहीत. आम्ही असंख्य चांगले शोधनिबंध प्रसिद्ध करतो; पण याला कल्पनांची देवाणघेवाण असे म्हणता येत नाही. थोड्याच वर्षांपूर्वी चांगल्या कल्पना कोणत्या, याचा आम्ही विचार करीत असू; पण आता असे विचार-मंथन होत नाही. मी बर्कलीला जाऊन ज्या कल्पना, विचार शिकतो, समजून घेतो त्यामुळे माझे विचार सपक होतात, तेथे शिकलेल्या गोष्टीच मी येथे येऊन करतो आणि त्याविषयीचे माझे चार-पाच लेख छापले गेले की, मी संतुष्ट होतो. काही लोकांचा असे लेख लिहून छापण्याचा झपाटा विश्वास बसणार नाही एवढा मोठा असतो. थोडक्यात, मी येथून परदेशी जातो, तेथे सहा महिने राहतो आणि माझे विचार निश्चित होण्यास अवसरच देत नाही."

सी. व्ही. रामन यांच्याबरोबर संशोधन केलेल्या एका वरिष्ठ वैज्ञानिकाचा भर पुढील मुद्द्यावर आहे : परदेशवारीमुळे पुष्कळदा आपली मूळची आवड खंडित होते व ज्यांची परदेशात चलती आहे अशा आवडी स्वीकारल्या जातात. तो म्हणाला :

"रामन यांच्या काळातही डॉक्टरेटची पदवी मिळविण्यासाठी परदेशी जावे, अशी प्रत्येकाची इच्छा असे. मग येथे २–३ वर्षे संशोधन करावे आणि नंतर पुन्हा २–३ वर्षे परदेशी जाऊन संशोधन करावे असे संशोधकांना वाटत असे. परदेशातील अध्ययनाचे आकर्षण नेहमीच वाटत आलेले आहे; परंतु त्या काळात

येथे परत आल्यावर संशोधकाची पूर्वपरंपरेपासून पूर्णपणे फारकत होत नसे."

असे असूनही भारतीय शास्त्रज्ञ स्वतःला पाश्चात्त्य शास्त्रज्ञांहून कमी लेखतात. आणि परदेशवारी केलेली नसणे हे संकुचितपणा व मागासलेपणाचे लक्षण मानतात. अशा प्रकारे परदेशवारीमुळे भारतीय शास्त्रज्ञाचा आत्मविश्वास वाढून या अल्पकालीन परदेशी मुक्कामामुळे त्याचा फायदा होऊ शकतो. यातून कधी कधी आपला दर्जा परदेशी वैज्ञानिकांपेक्षा कमी नाही अशी त्याची खात्री पटते. या बाबतीत एका वरिष्ठ वैज्ञानिकाचे मत असे आहे :

" येथील तरुण वैज्ञानिक परदेशी का जातात असे विचारल्यास 'ते तेथील शास्त्रज्ञ काय संशोधन करीत आहेत हे जाणून घेण्यासाठी व आत्मविश्वास मिळविण्यासाठी जातात' असे उत्तर मी देईन. तेथे मोठी यंत्रे असतात व त्यांच्यापाशी नवे तंत्रज्ञान आहे. यातूनच आपण जे करतो ते काही खरे नाही, असा समज निर्माण होतो. यातून आत्मविश्वास कमी होतो. म्हणून माझ्या सहकाऱ्यांनी येथे थोडेफार सैद्धान्तिक संशोधन केल्यावर मी त्या सर्वांना परदेशी पाठवीन. त्यामुळे आपण तेथील शास्त्रज्ञांइतकेच पात्र आहोत, हे त्यांना दिसून येईल."

अशा प्रकारे आत्मविश्वास निर्माण झाला, तरी अशा शास्त्रज्ञांकडून भारतातील संशोधनात नेहमीच सुधारणा घडून येईल, असे म्हणता येत नाही. यांपैकी अगदी थोडेच शास्त्रज्ञ आपल्या संशोधनात परदेशी अनुभवाचा उपयोग करून घेऊ शकतात. अशा शास्त्रज्ञांनी तेथील आपल्या सहकाऱ्यांशी चांगले वैयक्तिक संपर्क राखलेले असतात.

भारतीय शास्त्रज्ञ क्वचितच पाश्चात्त्य वैज्ञानिकवर्गात यशस्वी रीतीने सहभागी होऊ शकतात. याची दोन कारणे आहेत. एक तर त्यांचा पाश्चात्त्य वैज्ञानिकांशी अल्प काळ व मर्यादित प्रमाणातच संबंध येतो. आणि दुसरे म्हणजे एखादा उपयुक्त व महत्त्वाचा प्रश्न शोधून त्यातून आपला स्वतःचा संशोधन कार्यक्रम राबविण्याइतपत आत्मविश्वास त्यांना आलेला नसतो. त्यांच्या या अनियमित परदेशवाऱ्यांतून विधायक व उत्पादक कार्याला उपकारक ठरतील अशा तऱ्हेचे उच्च दर्जाचे सामाजिक संबंध निर्माण होतातच असे नाही. ते आपल्या संशोधनविषयात हवे तसे बदल करण्यास प्रवृत्त होतात. म्हणजे स्वतःच्या बदललेल्या वैज्ञानिक अभिरुचीचा हा परिणाम नसतो. यामुळे आपल्या भावी संशोधन कार्याच्या दृष्टीने उपयुक्त ठरेल असा प्रकल्प हाती घेण्याची धमक त्यांच्या अंगी येत नाही. त्यामुळे संघभावनेने करावयाच्या सुस्पष्ट संशोधन कार्यक्रमात या संशोधनाला जागा मिळणे अवघड असते. थोडक्यात, आपल्याला पटेल व रास्त ठरेल असे संशोधन हाती घेण्यासाठी लागणारी बौद्धिक तयारी कमी पडते.

## भारतीय वैज्ञानिक समाज

संशोधनातील वैज्ञानिक मूल्ये समान असणाऱ्या वैज्ञानिकांच्या गटाला वैज्ञानिक समाज वा गट म्हणता येईल. असा समाज आवश्यक असतो. कारण त्यामुळे वैज्ञानिक कसोटचा व आस्था टिकविली जाण्यास व बळकट होण्यास अनुकूल स्थिती निर्माण होते. भारतातील शास्त्रज्ञांमध्ये परस्परांमध्ये अनौपचारिक संबंध विशेष नाहीत व परदेशी वैज्ञानिकांबरोबरही असा संपर्क जवळजवळ अभावानेच आढळतो. त्यांच्यात असलेला भौगोलिक अंतराचा दुरावा हेच याचे एकमेव कारण नाही. भारतात एकमेकांशी असे संबंध नसण्याचा पटेल असा खुलासा करता येत नाही. भारतात व्यक्तिगत पातळीवर गाठीभेटींतून अथवा लेखनाद्वारे बेताचाच संपर्क वैज्ञानिकांदरम्यान येतो. एकाच विभागातील अथवा एकाच संस्थेतील वैज्ञानिकांनाही परस्परांच्या संशोधनाची माहिती नसल्याचे या अभ्यासातून बऱ्याच वेळा उघड झाले. याचा एक मासला म्हणून एका भौतिकीय धातुवैज्ञानिकाचे पुढील म्हणणे देता येईल :

"परस्परसंबंधाचा वा समन्वयाचा अभाव हे भारतीय संशोधनाचे (वा त्याच्या अभावाचे) गुणवैशिष्ट्य सांगता येईल. याचा अर्थ माझ्या आवडीचे क्षेत्र केवळ माझे मलाच माहीत असते. जेव्हा एखाद्या आंतरराष्ट्रीय परिषदेत एकाच विभागातील भारतीय वैज्ञानिकांची भेट होते, तेव्हाच आपल्या सहकाऱ्यांच्या संशोधन क्षेत्रांची माहिती त्यांना होते. संशोधन संस्थांमधून तर याहून वाईट स्थिती आढळते. उदाहरणार्थ, मी धातूच्या पोताविषयी अध्ययन करीत आहे हे माझ्याच संस्थेतील प्रा. क्ष ला माहीत नव्हते आणि तोही अशाच तऱ्हेचे संशोधन करीत असल्याचा आम्हाला पत्ता नव्हता... आमच्या संस्थेत अशी एक बौद्धिक दरी आहे. येथे होणारी तंत्रविद्येविषयीची





अनुक्रमणिका

चर्चासत्रे अतिशय दयनीय स्वरूपाची ठरतात. कारण गेल्या चार वर्षांमध्ये झालेल्या चर्चासत्रांत विद्याशाखेतील एकही सदस्य वा पदवीधर विद्यार्थी एखाद्या विशिष्ट विषयावर बोललेला नाही. उलट, जर्मनीमध्ये प्रत्येकाला दर दोन महिन्यांनी कोणत्या तरी नवीन विषयावर बोलावेच लागते..."

देशातल्या देशात एकमेकांशी व्यक्तिगत संपर्क निर्माण न झाल्याने लेखनाद्वारे पाश्चात्त्य वैज्ञानिकांशी संपर्क साधण्याची वृत्ती वाढीस लागते. अशा तऱ्हेने देशातील शास्त्रज्ञांपेक्षा परदेशी शास्त्रज्ञांबरोबर भारतीय शास्त्रज्ञ अधिक संपर्क राखून असतात, हे खरेच आहे. या दोघांनी घेतलेल्या भारतीय वैज्ञानिकांच्या मुलाखतींत पाश्चात्त्यांच्या संशोधनाचा उल्लेख वारंवार व सहजगत्या होत असल्याचे त्यांच्या लक्षात आले. मात्र भारतातील आपल्या सहकाऱ्यांच्या संशोधनाचा कोणी आवर्जून उल्लेख केला नाही. पाश्चात्त्यांकडून येथील संशोधनाला सहजासहजी मान्यता मिळत नाही, हे खरेच; परंतु अन्य भारतीय शास्त्रज्ञांकडून अशी मान्यता मिळणे ही अधिक अवघड गोष्ट आहे. या संदर्भात एक घन अवस्था भौतिकीविद म्हणाला :

"आमच्या देशात सैद्धान्तिक तसेच प्रायोगिक संशोधन करणारे चांगले शास्त्रज्ञ आहेत व ते यामध्ये स्वतःच पुढाकारही घेतात. मात्र येथील वरिष्ठ संशोधक यात भर पडण्याच्या दृष्टीने अथवा अशा संशोधनाला मान्यता देण्याच्या दृष्टीने विशेष काही करीत नाहीत. मला जी काही मान्यता मिळाली आहे ती सर्वस्वी पाश्चात्त्य संशोधकांकडून मिळालेली आहे."

अतिशय कृतिशील (निर्मितिक्षम) व कमी कृतिशील वैज्ञानिक निरनिराळ्या प्रकारे संपर्क साधतात. कमी कृतिशील संशोधक देशी सहकाऱ्यांबरोबर निकटचे संबंध ठेवून असतात. उलट, अधिक कृतिशील व यशस्वी संशोधकांचा स्थानिक वैज्ञानिक वातावरणाशी जवळजवळ संपर्क नसतो. या संदर्भात एका आंतरराष्ट्रीय ख्यातीच्या मूलकण भौतिकीविदाबरोबरचा या अभ्यासकांचा झालेला पुढील संवाद बोलका आहे :

प्रश्न : तुमच्या प्रकाशित लेखनात भारतीय सहकाऱ्यांचा उल्लेख तुम्ही कशा प्रकारे करता ?

उत्तर : असा उल्लेख नसतोच असे मी म्हणेन. त्यांचा थोडाफार जुजबी उल्लेख इकडेतिकडे येऊ शकेल; परंतु (आम्ही) मुख्यतः परदेशी वैज्ञानिकांचे संदर्भ देतो.

प्रश्न : म्हणजे आपल्या भारतीय सहकाऱ्यांपासून पूर्णपणे फटकून राहिले, तरी तुमच्या संशोधनात कोणती अडचण येत नाही, हो ना ?

उत्तर : हो, हे खरे आहे ! आणि मी त्यांच्यापासून अगदी अलग पडलो आहे. हे सर्व किती लोक करीत आहेत यावर अवलंबून असते ...... म्हणजे आघाडीवर असलेल्या कोणत्या क्षेत्रात व त्यातल्या गुंतागुंतीच्या कोणत्या स्तरावर किती संशोधक काम करीत आहेत, यावर हे अवलंबून असते. मात्र अशा चांगल्या संशोधकांची भारतात चांगलीच वानवा आहे. ......शिवाय विशेषीकरणाची क्षेत्रे खूप असल्याने अन्य चांगले संशोधक संशोधनासाठी वेगळीच विशेषीकृत शाखा निवडतात. थोडक्यात, अशा आघाडीवरच्या क्षेत्रात भारतात संशोधन करणारे बहुधा तुम्ही एकटेच असता. म्हणजे तुमच्या अडचणीत उपयोगी पडतील असे अगदी थोडेच संशोधक येथे असतात. खरोखरच एखादा अवघड प्रश्न तुम्हाला सतावीत असेल, तर त्याविषयी चर्चा करण्यासाठी कोणी उपलब्ध नसते. अशा तऱ्हेने एकत्रित येऊन उत्साहाने संशोधन करणाऱ्यांचे केंद्र वा मंडळ येथे नाही, ही मोठीच उणीव आहे."

अतिशय मेहनती भारतीय संशोधक अलग पडलेले आहेत. मात्र त्यांचा आंतरराष्ट्रीय पातळीवरचा संपर्क दांडगा असून त्याला वारंवार उजाळाही देण्यात येतो. येथील वैज्ञानिक लेखनाकडे आघाडीच्या वैज्ञानिकांकडून दुर्लक्ष होणे, हे विशेष लक्षण म्हणता येईल. सर्वसामान्य भारतीय शास्त्रज्ञ विदेशी संशोधकांपेक्षा देशी सहकाऱ्यांशी अधिक संपर्क ठेवून असतो. पण हे संबंध निरर्थक समजले जातात.

भारतीय शास्त्रज्ञ इतर देशी संशोधकांची दखल घेत नाहीत, ही बाब मुलाखतींतून पुनःपुन्हा नमूद झाली. प्रमुख भारतीय शास्त्रज्ञांना इतर भारतीय शास्त्रज्ञ आपले आदर्श मानीत नाहीत; कमी प्रसिद्ध संशोधक अधिक महत्त्वाच्या वैज्ञानिकांच्या संशोधनात मनापासून रस घेत नाहीत. थोडक्यात ख्याती व उच्च दर्जाची कर्तबगारी ही एकत्र नसतात. या बाबतीत पुढील शेरा मासलेवाईक म्हणता येईल :

"परदेशात लायक वैज्ञानिकच मोठा वैज्ञानिक होऊ शकतो. याचे कारण उघडच आहे. तेथील विज्ञान-



अनुक्रमणिका

विषयक कार्य अतिशय खुल्या वातावरणात चालते. तेथे नेहमीच चर्चासत्रे चालू असतात. योग्य तयारी केली नाही, तर शास्त्रज्ञ त्या वर्तुळातून बाहेर फेकला जातो. येथे प्राध्यापकाला व्याख्यानानंतर विद्यार्थी प्रश्न विचारीत नाहीत; ते घाबरतात. तेथे विद्यार्थ्यांना असा धाक वाटत नाही. उलट, उत्तरे टाळणाऱ्या प्राध्यापकाला गेला उडत म्हणून विद्यार्थी बाहेर पडतील. भारतातील वैज्ञानिक संशोधनाचा व्यावसायिक दर्जा तेवढासा चांगला नाही. पाश्चात्त्य देशांत विज्ञानाचा विकास स्वाभाविक रीतीने झाला. त्यामुळे तेथील संशोधन एका चांगल्या व उच्च दर्जाचे आहे. तेथील संशोधकांचे गट चांगले स्थिरस्थावर झालेले, रुळलेले आहेत. वैज्ञानिक वर्तुळातील उच्चपदस्थ मंडळी सामान्यपणे अतिशय पात्र असून त्यामुळे तेथील गुणवत्ता उच्च प्रतीची राखली जाण्यास मदत होते. ऐतिहासिक बाबींमुळे येथे अशी परिस्थिती नाही. येथील वैज्ञानिक वर्तुळात अतिशय शक्तिशाली असणारी मंडळी वैज्ञानिक दृष्टीने अगदी अपात्र असतात. त्यामुळे लायक व्यक्तींची कुचंबणा होते. कारण बढती नाकारली जाण्यासारख्या नित्याच्या ताणतणावाच्या गोष्टींना त्यांना सामोरे जावे लागत असते."

भारतीय शास्त्रज्ञांना एकमेकांसाठी फारच थोडा वेळ मिळतो, असे दिसते. येथे भारतीय शास्त्रज्ञांमध्ये थोडाच उत्साहवर्धक संपर्क येत असतो. परदेशी असताना मात्र ते अधिक उत्साही, तरतरीत व अधिक संपर्क राखणारे असतात, असे एका भौतिकीविदाचे मत असून तो म्हणतो :

"या देशात वैज्ञानिकांचा समाज (अथवा मांदियाळी) असा नाही... माझ्या सहकाऱ्यांना मी फक्त परदेशी भेटतो. अगदी दिल्लीतील माझ्या सहकाऱ्याची गाठही परदेशीच पडते. आपल्याकडेही परिषदा, विषयवार बैठका, परिसंवाद वगैरे गोष्टी रीतसर होत असतात. मात्र यांची योजना काही थोर मंडळींकडून गुप्त हेतूंनी केली जाते. यांतून काही फारसे हाती लागत नाही. म्हणून येथे वैज्ञानिक समाज उभा राहिला नाही. अशा एखाद्या सुसंघटित समाजात प्रकाशनपूर्व फलितांची देवाणघेवाण होत असते, घटना घडत असतात व तेथे एक तऱ्हेचे चैतन्य सळसळत असते. येथे तसा कोठलाही जिवंतपणा आढळत नाही. परदेशातून येणारे टपाल आमच्या चैतन्याचे निधान आहे व तेही डाकव्यवस्थेवर अवलंबून असते. आणि ही सर्वांत दुःखद गोष्ट आहे. येथे चैतन्य मृतप्राय होते व अवसान गळून पडते. येथील चैतन्यहीन लोकच परदेशात चारचौघांप्रमाणे व स्वाभाविक रीतीने वागू लागतात. याचा अर्थ तेथील लोक अधिक चांगले आहेत, असा नाही. याचे कारण आहे तेथील समाज. त्यामध्ये एक प्रकारचे चर्चापीठ आहे, एक तऱ्हेचा समाज आहे. तो क्षूद्र समूह नाही, एक वैज्ञानिक समाज वा कुटुंब आहे आणि त्यात सहभागी असावे असे तुम्हाला वाटते. येथे तुम्ही स्वतः होऊन आपल्या जबाबदारीवर काही तरी करीत असता. येथे नेहमी उत्साहाने कोठली तरी उलाढाल चालू असतेच असे नाही. आपल्या आवडीनुसार लोक कोणत्या तरी गोष्टी करीत असतात. परंतु विज्ञानाच्या प्रगतीत समरसून सहभागी होणारा सुसंघटित, समृद्ध समाज येथे निर्माण झालेला नाही."

भारतातील वैज्ञानिक एकमेकांच्या कार्याकडे दुर्लक्ष करतात आणि हा येथील सार्वत्रिक अनुभव आहे. यातून एक मूलभूत प्रश्न समोर येतो. भारतातील विज्ञान व वैज्ञानिक धोरण यांत आघाडीवर असलेल्या व्यक्तींचा भारतीय वैज्ञानिकांशी विशेष संपर्क येत नाही. किमान प्रत्यक्ष व्यक्तिगत संपर्काच्या बाबतीत तरी ही गोष्ट खरी आहे. अशा व्यक्तीच वैज्ञानिक धोरणविषयक निर्णय घेतात व शासनाला शिफारशी करतात. या निर्णयांचा व शिफारशींचा आधार असणारी माहिती येथील शास्त्रज्ञांबरोबरच्या व्यक्तिगत संपर्कातून मिळालेली नसते अथवा येथील वैज्ञानिक जीवनात सहभागी होऊन मिळविलेली नसते. पाश्चात्त्य देशांत अशी स्थिती नसते. उदाहरणार्थ, शासनाला सल्ला देणारे तेथील शास्त्रज्ञ हे आपापल्या विद्यापीठातून वैज्ञानिक म्हणून प्रत्यक्ष काम करीत असतात. परिणामी वैज्ञानिक संशोधन नेमून देणाऱ्या व त्यासाठी निधी उपलब्ध करून देणाऱ्या भारतीय अधिकाऱ्यांना वैज्ञानिक माहितीचा अभाव असतानाच निर्णय घेणे भाग असते आणि त्यांना सल्ला देणाऱ्यांना भारतातील वैज्ञानिक स्थिती प्रत्यक्षात कशी आहे याची माहिती नसते. संशोधनविषयक निर्णय घेणाऱ्या सत्ताधारी व्यक्तींना भारतीय वैज्ञानिकांच्या परिस्थितीची कल्पना नसते. परिणामी संशोधनासाठी विषय निवडताना व्यक्तिगत पातळीवर वैज्ञानिकाला स्वातंत्र्य असले, तरी त्याचा



अनुक्रमणिका

उपयोग होतोच असे नाही. या बाबतीत एका घन अवस्था भौतिकीविदाने पुढील उद्गार काढले :

" ते (अणुऊर्जा विभाग) पैसे देतात, पण संशोधन प्रकल्पांवर त्यांचे कोठलेही नियंत्रण नसते. आम्ही प्रकल्प पुढे ठेवतो व ते निधी मंजूर करतात. संपूर्ण प्रकल्पाची आखणी आम्हीच करतो. या आखणीसाठी आम्ही 'द फिजिकल रिव्ह्यू', 'जर्नल ऑफ फिजिक्स' इत्यादी नियतकालिकांचे साहाय्य घेतो."

अशा संशोधनाचा भावी काळात उपयोग करून घेऊ शकतील अशा संभाव्य लोकांना या संशोधनात व त्यातून मिळणाऱ्या निष्कर्षांत अल्पस्वल्पच रस असतो. भारतातील अनुप्रयुक्त (व्यवहारोपयोगी) संशोधन असफल ठरण्याचे हे दुसरे कारण आहे. त्यांना एक तर विज्ञान सहानुभूतीपूर्वक जाणून घेण्याची इच्छा नसते अथवा अशा संशोधनाचा त्यांच्या कामात प्रत्यक्ष उपयोग होत नसावा. किंवा अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे इतर भारतीय संशोधकांप्रमाणेच संशोधनाचा उपयोग करून घेणाऱ्यांना अशा संशोधनाविषयी विशेष आस्था वा आदर वाटत नसावा. अशा तऱ्हेने येथील उद्योजक, राजकारणी व नागरी सेवक यांच्याकडून वैज्ञानिक संशोधनाची वा संशोधकांची उपेक्षा वारंवार होत असते. त्यामुळे येथील वैज्ञानिक उपेक्षेत गुरफटून गेला आहे. एका भौतिकीय धातुवैज्ञानिकाचे म्हणणे असे आहे :

" कणांची विशिष्ट मांडणी असणाऱ्या व कमी-तापमानाला लाटून बनविलेल्या खास पत्र्यांमध्ये धातूच्या पोताविषयीच्या माझ्या संशोधनाचा उपयोग करून पाहायचा होता व त्याकरिता मी या संशोधकांच्या तुकडीत सामील झालो होतो. मात्र आता अशी संयुक्त द्रव्ये (काँपोझिट) विकसित करण्यात काहीही रस उरला नाही. कारण या संदर्भातील एका मोठ्या रकमेचे कंत्राट या विभागाच्या मंत्र्याने परस्परच एका अमेरिकन कंपनीशी केले आहे. आम्ही आमच्या भावना मोकळेपणाने शासनापुढे मांडण्याआधीच या कंत्राटावर सह्याही झाल्या."

दुसऱ्या एका वैज्ञानिकाने आपली खंत अशी व्यक्त केली : " खतांचे तीन व लोखंड व पोलादाचे पाच कारखाने सरळ आयात करण्यात आले. या निर्णयात कोठेही संशोधकांचा संबंध आला नव्हता." अशा प्रकारे बहुधा नेहमीच आणि शासनाकडून संशोधनासाठी आर्थिक साहाय्य देण्यात येते तेव्हाही शासन येथील संशोधकांची उपेक्षाच करते.

सुमारे ३०–३५ वर्षांपूर्वी भावनगरला एक तेल शुद्धीकरण कारखाना परदेशी कंपनीमार्फत उभारण्याचे घाटत होते. तेव्हा मेघनाद साहा यांनी पंतप्रधान नेहरूंच्या या निर्णयाला विरोध करताना आपले म्हणणे असे मांडले होते :

" ते (परदेशी लोक) आपल्याला त्यांच्या जाळ्यात गुरफटून टाकू इच्छितात. अमेरिकन भांडवलदारांची भारताविषयीची मनोवृत्ती पुढील सत्य घटनेवरून उघड होईल : त्यांनी बंगालमधील त्रिभुज प्रदेशाची खनिज तेल शोधण्यासाठी चुंबकमापी हवाई पाहणी केली होती. तेव्हा त्यांच्या उपकरणाच्या जवळपास फिरकण्यास भारतीय वैज्ञानिकांना मनाई होती. ते कशा प्रकारे काम करतात हेही भारतीय संशोधकांना पाहू देण्यात आले नाही. या पाहणीतून मिळालेली सर्व माहिती ते अमेरिकेला घेऊन गेले. या पाहणीतून कोणते निष्कर्ष मिळाले हे आपल्याला सांगोवांगी कळू शकतील. अन्यथा त्यांनी दयाबुद्धीनेही ते सांगण्यास संमती दिली नाही, तर हे निष्कर्ष या देशाला माहीतच होणार नाहीत. त्यांना येथे तेल सापडले म्हणजे विहिरी खोदण्यासाठी व शुद्धीकरण कारखाने चालविण्यासाठी आपल्याच देशातील तंत्रज्ञ घेऊन येतील आणि हा उद्योग चालविण्याच्या बाबतीत इराणप्रमाणे हा देशही असहाय व परावलंबी होईल."[९]

त्या वेळच्या इतर भारतीय वैज्ञानिकांनाही अशीच उपेक्षा हताशपणे सहन करावी लागली. विज्ञानाचा 'वापर' करून घेऊ शकणाऱ्या लोकांनीही भारतातील विज्ञान व वैज्ञानिक संशोधन यांच्याकडे दुर्लक्ष केले. यामुळे भारतात सर्वत्र अनुप्रयुक्त विज्ञानाऐवजी 'शुद्ध' विज्ञानाच्या संशोधनाकडील कल वाढत असलेला दिसतो. यातून स्वतःच्या अनुभवाच्या आधारे संशोधनासाठी विषय निवडण्याची प्रवृत्ती कमी होते आणि छापील वैज्ञानिक साहित्याकडे लक्ष ठेवण्याची वृत्ती बळावते. अशा तऱ्हेने या दोन्ही बाबतींत त्यांचे कार्य काठावरचे (मामुली) ठरते. आपण संशोधनातून काढलेले निष्कर्ष कधीच वापरले जाणार नाहीत, ही जाणीव झाल्याने ते अशा तऱ्हेने सीमावर्ती क्षेत्रातील प्रश्न हाताळणे स्वाभाविकच असते. हे प्रश्नही त्यांना पाश्चात्यांचे वैज्ञानिक लेखन वाचताना सापडतात. काही थोड्या वैज्ञानिकांनी

हा अनुभव घेतलेला आहे. भारतातील उद्योगात भावी काळात वापरण्याच्या दृष्टीने समर्पक ठरेल असे संशोधन करण्यास त्यांनी सुरुवात केली होती. मात्र याचा भारतीय उद्योगधंद्यात कधीही उपयोग करून घेतला जाणार नाही, हे कळून आल्यावर या शास्त्रज्ञांनी त्याचा नाद सोडला आणि संशोधनासाठीचे विषय पाश्चात्त्य वैज्ञानिक साहित्यातून निवडायला सुरुवात केली. त्यांच्यापैकी एकजण म्हणाला :

" संशोधनाचा लगेचच उद्योगात वापर केला जाणे ही संशोधनामागील प्रेरणा असते, असे मला युरोपात अनुभवास आले होते. उलट, येथे उद्योग व संशोधन-संस्था यांच्यामधील परस्परसंबंध यथाशास्त्र नसल्याने ते संशोधनातील धोंडच ठरतात. उद्योगाशी विचार-विनिमय करून संशोधनास सुरुवात करावी असे आमचे प्रयत्न असतात. तथापि, उद्योजकांकडून याला मिळणारा प्रतिसाद उत्साहवर्धक नसल्याचाच अनुभव येतो. हाती असणाऱ्या साधनसामग्रीच्या मदतीने कोणते तरी उपयुक्त काम झटपट करून मोकळे होता आले, तर त्यातून तुमच्या पुढील कामातील उत्साह वाढतो. यातून परदेशात मान्यताही मिळते. अशी साधने नेहमीच सहजपणे उपलब्ध असतात असे नव्हे. म्हणून त्यांचा योग्य प्रकारे वापर करता येईल अशा तऱ्हेचे संशोधन हाती घेऊन पार पाडणे आवश्यक असते."

दुसऱ्या एकाचा अनुभव यासारखाच आहे. तो म्हणाला : "नेहमीच्या व्यावहारिक ( प्रायोगिक ) संशोधनाचा मला विशेष फायदा झाला नाही. गेली ७–८ वर्षे मी थोडीफार धडपड केली. माझ्या या संशोधनात उद्योजक रस घेतील, असे मला वाटले होते. परंतु ते त्यांच्या उत्पादनात आणि अडीअडचणींमध्ये गुंतलेले होते. त्यांना आमच्या कल्पनांकडे लक्ष द्यायला फुरसत नव्हती. मग मी तरी त्यांची का फिकीर करावी ? ज्यामुळे माझा अहं सुखावेल तेच मी करीन. याचा अर्थ परत परदेशी जाण्याचा मार्ग ज्यामुळे खुला होईल, असे संशोधन मी करीन. यातच सर्व काही आले. मी मूलभूत संशोधनाकडे का वळलो याचे हे साधे, सरळ कारण आहे."

एक विज्ञानविषयक प्रशासक या बाबीकडे एका वेगळ्या (सोयीस्कर) दृष्टीने पाहून अशाच निष्कर्षाप्रत आला. तो म्हणाला :

"भारतातील वैज्ञानिक संशोधक इतके अलग पडले आहेत की, ते जवळजवळ निष्क्रियतेचा अनुभव घेत आहेत. उदाहरणार्थ, इंडियन इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजीमधील संशोधक अलग पडले आहेत. कारण येथील एकूण व्यवस्थेत त्यांच्या संशोधनाला स्थानच उरलेले नाही. याची जाणीव असल्याने ते अस्वस्थ आहेत......त्यांना त्यांनीच निर्मिलेल्या एका हस्तीदंती मनोऱ्यात माघार घ्यावी लागते. अर्थात हा मनोरा ही एक केवळ आत्मसंरक्षक (का आत्मवंचना करणारी) ढाल आहे. कारण त्यांनी कोणतेही संशोधन करण्यास हरकत नसली, तरी त्यांचे संशोधन वापरले जाणार नाही, असाच त्यांना अनुभव येतो. ......असे २५–३० वर्षे चालले आहे व हा मोठा चिंताजनक प्रश्न आहे"

## सर्वत्र आढळणारे अविश्वासाचे वातावरण

या पाहणीतील बहुतेक शास्त्रज्ञांना भारतातील एकूण विज्ञानविषयक व्यवहारातील व विशेषकरून खुद्द त्यांच्या संशोधनातील काठावरच्या स्थितीचा (मामुली स्वरूपाचा) त्रास झाला आहे. याला अपवाद म्हणजे मूलकण भौतिकीविदांचा एक गट. आपले संशोधन हे भारतातील संशोधनाच्या संदर्भात समर्पक (कालोचित) नाही याची त्यांना खात्री आहे. या बाबतीतील त्यांचे म्हणजे असे आहे : भारतात मूलकण भौतिकी हा विषय समर्पक असलाच पाहिजे असे नाही. कारण अशा विषयाला पाश्चात्त्य जगतातही ताबडतोबीची 'सामाजिक समर्पकता' असतेच असे नाही. घन अवस्था भौतिकीच्या बाबतीत मात्र उलट स्थिती आहे. या क्षेत्रातील संशोधनाची गुणवत्ता व वापर यांच्या बाबतींत भारत व पाश्चात्त्य देश यांच्यात चांगलीच तफावत असून तिचा येथील संशोधनावर विपरीत परिणाम होणे साहजिकच आहे. भारतामध्ये ज्याच्याकडे शुद्ध संशोधन म्हणून पाहिले जाते त्याचा तेथील प्रगत तंत्रविद्येद्वारे वापर करता येतो व परिणामी एकूण ज्ञानातही भर पडते. इतर क्षेत्रांतील भारतीय वैज्ञानिकांच्या संशोधनाची उपेक्षा होत आल्याने भारतीय वैज्ञानिक निराश झाले आहेत. त्यांची ही निराशा मुलाखतींमधून वरचेवर उघड झाली. याचे काही नमुने खालीलप्रमाणे होते :

"विज्ञानात मोलाची भर टाकावी, काही कर्तबगारी करून दाखवावी या ईर्षेने मी संशोधनाला सुरुवात केली होती. तरुणपणात प्रत्येकाचीच काही गुलाबी

स्वप्ने असतात. पण काहीं वर्षांतच आपण करीत असलेल्या संशोधनाची येथे गरज नाही असे माझ्या लक्षात आले. माझ्या मते येथील परिस्थितीमुळे वैज्ञानिक संशोधन यशस्वी होऊ शकले नाही. कारण येथील समाजाच्या गरजा पाहता ते अल्प प्रमाणातच उपयुक्त होते. पाश्चात्त्य लोक एक सुसंघटित वैज्ञानिक समाज म्हणून जसे पुढे जात आहेत जवळजवळ त्याच शैलीने जाण्याचा आपला प्रयत्न चालू आहे. त्यामुळे संशोधनासाठी विषय निवडतानाही ही दिशा आपण निवडतो. कारण त्यामुळे आपले काही तरी संशोधन प्रसिद्ध होण्यास संधी मिळेल, अशी अपेक्षा असते. मात्र या संशोधनाची कालोचितता आपण लक्षात घेत नाही. यावरचा उपाय वा पर्याय मी सांगू शकत नाही. परंतु येथे चालू घडीला विज्ञान व तंत्रविद्या यांच्या नावाने जे काही करण्यात येत आहे, ते काही उचित नाही."

याचा परिणाम म्हणजे सार्वत्रिक निराशा हा होय. वैज्ञानिक कार्याच्या विविध क्षेत्रांमध्ये हीच स्थिती आढळते. कारण १९४०–५० या दशकात अमेरिकेत अणुऊर्जेच्या कायद्यांवर अथवा युरोप-अमेरिकेत अणु-वीजेवर जशी सखोल चर्चा झाली त्यासारखे विचार-मंथन भारतात कधी घडलेले नाही. एका विज्ञान-विषयक प्रशासकाचे मत असे आहे :

" व्यापक दृष्टीने पाहिल्यास भारतीय वैज्ञानिकां-मध्ये एक सामाईक गोडी (वा हितसंबंध) आढळत नाही. मात्र वैज्ञानिक समाजातील नोकरशाहीचे हित-संबंध महत्त्वाचे ठरतात. याचा अर्थ आपली अनुदाने मिळतील याची खातरजमा करून घेण्यात त्यांना रस असतो... अमेरिकेच्या वैज्ञानिक मंडळींमध्ये अणुऊर्जेच्या कार्यक्रमावर अतिशय पोटतिडिकेने चर्चा करतात. येथे केवळ अणुऊर्जा आस्थापनाशी निगडित लोकच अभिप्रेत नाहीत; तर त्याबाहेरचे लोकही या दोषदर्शी टीकेत सहभागी होतात. भारतात मात्र अणु-ऊर्जा आस्थापनाबाहेरील कोणीही अणुऊर्जा कार्यक्रमां-विषयी साधकबाधक चर्चेत सहभागी झाले नाही. हा विनाशाचा मार्ग आहे, असे मला वाटते. या आस्था-पनातील लोक बाहेर पडण्यास केव्हा सुरुवात होईल हे तुम्हाला सांगता येणार नाही. ते स्वतःचे समर्थन करू शकणार नाहीत आणि हा संपूर्ण डोलारा कोसळू शकेल. एक वैज्ञानिक समाज म्हणून भारतीय वैज्ञानिकांचा वर्ग हा जबरदस्त वैज्ञानिक कल असलेला असा नाही. त्याला विज्ञानाविषयी तीव्र उत्सुकता नाही, देशातील विज्ञानाच्या निकोप वाढीविषयी त्याला मनःपूर्वक आस्था नाही. आपल्या कार्यात येथील वैज्ञानिक व्यक्तिगत वा सांघिक पातळीवर रस घेताना आढळतात; परंतु खुद्द विज्ञान व तंत्रविद्या यांच्या समग्र विकासात त्यांना रस नसतो. या दृष्टीने भारतीय वैज्ञानिक समाज पूर्णतया विस्कळीत वाटतो."

सामाईक वैज्ञानिक मूल्ये बाळगणारा एक सुसंघटित समाज म्हणून भारतीय वैज्ञानिकांकडे पाहता येत नाही. याचे कारण म्हणजे केवळ अगदी वैज्ञानिक अशा विषयांच्या (कार्यांच्या) बाबतीतही त्यांनी एकमेकांची उपेक्षा चालविली आहे, हे होय. वैज्ञानिक कार्य सुसंघटित करण्यासाठी उपाय सुचविण्याचे पृथक प्रयत्न झालेले आढळतात. असे जे थोडेफार प्रयत्न झाले आहेत, त्यांना मिळालेला प्रतिसाद उत्साहजनक नव्हता. तर काही शास्त्रज्ञांना या पर्यायांविषयी शंका आहेत. कारण त्याच जुनाट योजनांना नवीन नावे देऊन त्या अधिकृत करून घेण्याचे हे अप्रत्यक्ष प्रयत्न आहेत, असे त्यांना वाटते. एकमेकांविषयीचा अविश्वास व (प्रामाण्य वा) अधिकाराविषयीचा अविश्वास ही सर्वसामान्य बाब झाली असून हा अधिकार मग भारतीय वैज्ञानिकांचा असो, राजकरणी व्यक्तींचा असो नाही तर मुलकी सेवकांचा असो. भारतातील ग्रामीण जीवनाचे पुनर्वसन करण्यासाठी वैज्ञानिकांनी एक प्रस्ताव मांडण्याचा प्रयत्न केला; पण त्याचा विचार करण्यात आला नाही. या संदर्भात एक घन अवस्था भौतिकीविदाने पुढील प्रतिक्रिया व्यक्त केली :

" भारतातील तंत्रवैज्ञानिक संशोधनाची येथील उद्योगाशी तार जुळू शकली नाही. म्हणजे उद्योजकांवर त्याचा प्रभाव पडू शकला नाही. आपण ग्रामीण तंत्र-विद्येवर कसा प्रभाव पाडू शकू ? सध्या जे काही घडत आहे ते एखाद्या परवलीच्या शब्दासारखे आहे. तुमच्या कोठल्याही प्रकल्पात ग्रामीण हा शब्द घाला व तुम्हाला अनुदान मिळेल. ज्या व्यक्तीला अधिक अनुदाने मिळ-तात तिने बहुधा खेडे कधीच पाहिलेले नसते. खेड्यातील लोक काम कसे करतात, खेड्यातील कारागीर कसे काम करतो, त्यांना कोणत्या प्रकारच्या साठवणीच्या सुविधा हव्यात याविषयी त्या व्यक्तीला काही माहिती नसते. तरीही ग्रामीण विकासासाठी असलेल्या अनुदाना-तील मोठा हिस्सा त्याला मिळतो, ग्रामीण जनतेत







मिसळल्याशिवाय तेथील प्रश्न तुम्हाला समजणारच नाहीत. हे म्हणजे एखादी गोळी खाऊन ग्रामीण तंत्रविद्येतील 'तज्ज्ञ' बनण्यासारखे आहे. अर्थात या क्षेत्रात खरेखुरे काम करणाऱ्या एक-दोन व्यक्ती असू शकतील. मात्र मला तरी या प्रचारमोहिमेविषयी किंचितही आशा बाळगावी असे वाटत नाही."

पुष्कळ भारतीय वैज्ञानिकांनी तंत्रविद्या व यंत्रसामग्री पाश्चात्त्य देशांतून आयात करण्याच्या धोरणास उघड विरोध केला होता. तरी 'उचित (समर्पक) तंत्रविद्या' या अलीकडच्या प्रचारमोहिमेमुळे भारतीय वैज्ञानिकांमध्ये विशेष जागृती निर्माण झाली नाही. इतर पुष्कळांप्रमाणेच त्यांनाही ही मोहीम या संदर्भात शंकास्पद वाटते. एका सामग्रीवैज्ञानिकाचे पुढील मत प्रातिनिधिक म्हणता येईल. तो म्हणाला :

"उचित तंत्रविद्येला प्रोत्साहन देता येऊ शकते. ती टिकून रहायला हवी व खरे म्हणजे तिची भरभराटही झाली पाहिजे. हे साध्य करण्यासाठी अशा संस्थांऐवजी इतरत्र प्रयत्न करायला हवेत. कदाचित या उच्चशिक्षित, उच्चपदस्थ व प्रचंड क्षमता बाळगणाऱ्या लोकांचा उपयोग उचित तंत्रविद्येचा पाठपुरावा करण्यासाठी करून घेता येऊ शकणार नाही. हे त्यांचे कार्यक्षेत्र नाही. या कार्यक्रमाची जबाबदारी ज्यांच्यावर आहे त्यांच्याशी मी बोललो आहे. ही भारताची मुख्य समस्या आहे व आम्ही करदात्यांना जबाबदार असले पाहिजे, असे ते म्हणतात. आम्ही दुसऱ्या प्रकारेही करदात्यांचे उत्तरदायी आहोत. या संस्थांमध्ये असताना जर आम्ही चांगले संशोधन केले नाही तर मग आम्ही प्रथम दर्जाचे संशोधन कोठे करावे अशी अपेक्षा आहे? प्रगत संशोधनाच्या बाबतीत आम्ही जगाबरोबर राहण्याचा प्रयत्न केला नाही, तर भावी पिढ्या आम्हाला जाब विचारतील. काचेच्या तंतूंमधून प्रकाशाद्वारे संदेशवहन करण्याचे तंत्र, चुंबकत्वावर चालवायच्या मॅग्लेव्ह आगगाड्या यांसारख्या अगदी प्रगत विषयांतील संशोधनाची चिंता इतरांना लागून राहिलेली असताना हे मूर्ख लोक गोबर वायूवरील संशोधनात का गुंतून पडले होते? हा पुढील पिढीचा सवाल असेल.

भारतीय शास्त्रज्ञ सध्याच्या संशोधनाच्या कार्यक्रमाच्या स्वरूपाविषयी जेवढे नाराज आहेत तेवढेच ते याला पर्यायी अशा कार्यक्रमांविषयी साशंक आहेत. विशेषकरून परदेशात ज्यांनी विपुल कार्य केले आहे व यासाठी ज्यांचा आदर करण्यात येतो असे शास्त्रज्ञ विशेषतः अशा 'पर्यायी विज्ञाना'च्या नव्या प्रस्तावांवर टीका करताना आढळतात. या प्रस्तावांमुळे वैज्ञानिक सचोटीच्या बाबतीत जी जादा तडजोड करावी लागते तिच्यावर त्यांच्या टीकेचा खरा रोख असतो. बहुसंख्य वैज्ञानिकांच्या दृष्टीने पर्याय म्हणजे जोखीम होय. आणि काठावरच्या स्थितीत असणारे हे वैज्ञानिक अशी जोखीम पत्करायला नाखूष असतात. त्यांचा व्यवहार सावधपणे होत असतो. त्यामुळे ज्यात आधीच संशोधन करण्यात आलेले आहे व केवळ गौण व्यापकीकरणाची (वा विस्ताराची) गरज आहे असेच विषय संशोधनासाठी सुरक्षित मानले जातात. या प्रस्तावांशी निगडित असणाऱ्या वैज्ञानिक सचोटीच्या कसोट्यांकडे दुर्लक्ष होतेच. शिवाय भारतीय विज्ञानाचा ओघ विवेकनिष्ठ कल्पनेपोटी 'सामाजिक औचित्या'कडे वळविण्याच्या चळवळीमुळे जी विचारांची सरमिसळ होईल तीमुळे 'पर्यायी विज्ञाना'द्वारे मिळणारे लाभ व मान्यता यांविषयी भारतीय शास्त्रज्ञांच्या मनात शंका उरतील. वैज्ञानिक संशोधनाविषयी आचरणात आणावयाचे नियम व प्रमाणभूत गोष्टी टिकवून ठेवील व त्यांची खातरजमा करून घेईल असा वैज्ञानिक समाज भारतात नाही. त्यामुळे भारतीय वैज्ञानिकाला स्वतःच्या मगदुरावर अवलंबून राहणे भाग असते. तो आधुनिक विज्ञानाचा मार्ग ठामपणे अनुसरतो, बाह्यतः नवीन वाटणाऱ्या कोणत्या तरी संशोधनाला हात घालायचे ठरवू शकतो किंवा या दोन्ही मार्गांविषयी तो उदासीन असतो. भारतात 'पर्यायी विज्ञाना'ची काही थोडी उदाहरणे देण्यात आलेली असून ती वैज्ञानिक नव्हे तर सामाजिक कल्पनांच्या भाषेत स्पष्ट केली आहेत. काही झाले तरी आपल्याला वैज्ञानिक मानले जावे अशी भारतातील सर्व स्तरांवरील शास्त्रज्ञांची इच्छा असते. वैज्ञानिक हे विवेकनिष्ठ राजनीतिज्ञ असतील वा नसतील, पण आपली गणना वैज्ञानिक म्हणून व्हावी अशी त्यांची तीव्र इच्छा असते. कारण त्यांची आत्मप्रतिष्ठा ते वैज्ञानिक असण्यावर अवलंबून असते. मग ते भलेही काठावरचे वैज्ञानिक का असेनात. 'पर्यायी विज्ञाना'चे पुरस्कर्ते आधुनिक विज्ञानाची उपेक्षा करतात. त्यामुळे पर्यायी विज्ञानापासून ते फटकून राहतात किंवा ते त्यांच्यावर लादले जाते. शिवाय सामाजिक परिस्थितीप्रमाणेच त्यांची काठावरची

वैज्ञानिक स्थितीही जाचक ठरते. आपण वैज्ञानिक व उपयुक्त समाजघटक असावे अशी भारतीय संशोधकांची सर्वसाधारण धारणा असते. मात्र आपण तसे नाहीत याचे दडपण त्यांच्यावर येते. कदाचित 'पर्यायी विज्ञाना'तील विविध उपाययोजनांद्वारे सुचविल्यानुसार आपली उपयुक्तता निश्चित करण्याच्या प्रयत्नांनी ते भयभीत झालेले असतात. परिणामी त्यांची वैज्ञानिक वृत्ती कमी होईल. येथील दुर्बल वैज्ञानिक समाजामुळे त्यांची दशा आणखीनच खालावते.

## भारतातील वैज्ञानिक नियोजनामधील बौद्धिक सुविधा

भारताने राष्ट्रीय नियोजनात 'विज्ञान व तंत्रविद्या योजने'ला मध्यवर्ती स्थान दिलेले असून अशी योजना असलेला भारत हा तिसऱ्या जगातल्या अगदी थोडयाच देशांपैकी एक देश आहे. तथापि, या 'विज्ञान व तंत्रविद्या योजनां'मध्ये विज्ञानांतर्गत बाबी व त्यांचा विकास यांची दखल घेतलेली नाही. ज्या 'वैज्ञानिक पठडीत भारतीय वैज्ञानिक प्रशिक्षित होतात तिच्या आणि वैज्ञानिक हाताळू शकतील अशा व्यावहारिक संशोधन कार्यक्रमांच्या बौद्धिक गरजा या योजनांमध्ये विचारात घेतलेल्या नाहीत. भारतीय 'वैज्ञानिक नियोजनकारां'नी काही उद्दिष्टे समोर ठेवली आहेत. मात्र ती साध्य करण्यासाठी व्यवहार्य संशोधन प्रकल्प हाती घेण्याच्या दृष्टीने ती उचित नाहीत. एक तर अशी उद्दिष्टे 'गरिबी हटाव'सारखी अतिशय व्यापक (वा स्थूल) असतात. त्यामुळे ती वैज्ञानिक संशोधनाच्या प्रकल्पांद्वारे सरळपणे हाताळणे शक्य होत नाहीत. अथवा ही उद्दिष्टे इतकी संकुचित असतात की, त्यांच्यासाठी अतिशय विशिष्ट प्रकारची कामेच फक्त करावी लागतात. म्हणजे त्यांच्यासाठी संशोधन कार्यक्रमांची गरज नसते.

या योजनांमधून विशिष्ट प्रकारचे संशोधन प्रकल्प उभारणे वैज्ञानिकांना शक्य होत नाही. कारण योजनाकारांना वैज्ञानिक संशोधनात परंपरेने आलेल्या गोष्टींची माहिती नसते. तर संशोधकांना विशिष्ट तंत्रवैज्ञानिक व व्यावहारिक स्थितीची आणि या संशोधनाद्वारे सोडविण्यात यावयाच्या प्रश्नांची पुरेशी जाण नसते. असे लादलेले संशोधन कार्यक्रम हाती घेतानाच त्यांचे वैज्ञानिक वा तंत्रवैज्ञानिक निष्कर्ष उपलब्ध होतील तेव्हा हे कार्यक्रम व्यवहार्य ठरतील अशी माफक शक्यता त्यांना व्यक्त करावी लागते. यांचे वैज्ञानिक निष्कर्ष वापरता येतील याचा काही तरी पुरावा देण्याची आवश्यकता असते. अशा प्रकारे आतापर्यंत भारतीय संशोधनातून मिळालेल्या फलांचा (निष्कर्षांचा) अगदी थोडाच वापर झाला आहे. यामुळे ज्यांना असे संशोधन हाती घ्यावेसे वाटते, तेच नाउमेद होतात. भारतीय वैज्ञानिकांच्या प्रशिक्षणात परंपरेने एक बौद्धिक बांधिलकी आलेली आहे. वैज्ञानिक संशोधन हे उपयुक्त असले पाहिजे या सततच्या रेटचामुळे ही बांधिलकी व जबाबदारी धोक्यात आली आहे, असे काही भारतीय वैज्ञानिकांचे मत आहे. एक घन अवस्था भौतिकीविद उद्गारला :

"सैद्धान्तिक संशोधन कार्य करणाऱ्याला स्वाभाविक स्वातंत्र्य असते. त्याला आकाश हीच मर्यादा असते. जड वस्तूची त्याला प्रत्यक्ष गरज नसते. तो कोणत्याही उंचीपर्यंत भराऱ्या मारू शकतो. या परिस्थितीमुळे अगदी अग्रभागी असलेल्या प्रश्नांवरील संशोधन करणे त्याला जमते व आवडतेही. त्याने आपल्या महत्त्वाकांक्षेला लगाम घालावा असे सांगणे उचित नाही. (अन्यायकारक आहे.)"

येथील वैज्ञानिकांना 'सामाजिक दृष्टीने उपयुक्त' अशा संशोधनाकडे वळविण्याची नियोजनकारांची खटपट यशस्वी न होण्यामागील काही कारणे अशी आहेत : एकमेकांना जाणवणारी चिंता दोन्ही बाजूंनी लक्षात घेतलेली नाही. भारतीय वैज्ञानिकाच्या वैज्ञानिक व व्यावहारिक अकार्यक्षमतेचे समर्थन पुढील दोन लोकप्रिय मुद्द्यांच्या आधारे करण्यात येते : १) भारतीय वैज्ञानिकांत सामाजिक बांधिलकी नसते आणि २) सामान्यपणे एकूण भारतीय समाजात वैज्ञानिक वृत्ती आढळत नाही.

यांपैकी पहिल्या स्पष्टीकरणाचा उल्लेख राजकारणी मंडळी विविध व्यासपीठांवरून करीत असतात. अलीकडेच प्रा. एस. भगवंतम् या अग्रगण्य वैज्ञानिकांनी व विज्ञान नियोजनकारांनीही याचा पुनरुच्चार केला आहे. विज्ञान व तंत्रज्ञान गरिबांपर्यंत पोचविण्यात आलेल्या अपयशाचा उल्लेख करताना त्यांनी पुढील उद्गार काढले होते : "(या बाबतीत) खुद्द वैज्ञानिक हेच सर्वांत जास्त दोषी (पापी) आहेत."[१०] 'विज्ञान धोरणविषयक ठरावा' वरील परिषदेत समालोचन करताना डॉ. ए. रहमान यांनीही असाच उल्लेख केला होता. त्यांनी वैज्ञानिकांत 'सामाजिक बांधिलकी' नसते असा ठपका ठेवला होता. त्यांच्या मते येथील



अनुक्रमणिका

वैज्ञानिकांना "एखादी विशिष्ट शाखा, विभाग किंवा आस्थापनाला प्रोत्साहन देण्यासारख्या संकुचित हेतूचा केलेला आगाऊ स्वीकार" ही मुख्य बाधा झालेली आहे. या परिषदेस आलेले शास्त्रज्ञ गरिबीसारख्या प्रश्नावर मूग गिळून बसलेले पाहून त्यांनी पुढील मत व्यक्त केले : "गरिबी, बेकारी वगैरे गोष्टी ह्या जीवनाचेच एक (अभिन्न) अंग असल्याचे शास्त्रज्ञ मानून चालतात, असे वाटते. म्हणजे ही स्थिती अटळच आहे अशी त्यांची धारणा असते. आणि जणू काही यांपैकी कोणत्याही समस्येवरचे उत्तर विज्ञानापाशी नाही."[११]

केवळ विज्ञानाच्या मदतीने प्रमुख सामाजिक समस्या सोडविता येतात, या मताला ऐतिहासिक आधार नाही. विशेषीकृत विज्ञानशाखा व कार्यक्रम यांची प्रत्यक्ष बांधिलकी ही व्यावहारिक प्रश्न सोडविण्यातील एक घोंड ठरत नाही. वैज्ञानिक संशोधनाचे निष्कर्ष व्यावहारिक लाभासाठी वापरून घेण्याच्या दृष्टीने काम करण्याची परंपरा भारतीय उद्योगांत व वैज्ञानिकांत निर्माण झालेली क्वचितच आढळते व हीच खरी अडचण आहे. अर्थात उच्च वैज्ञानिक प्रमाणमूल्ये टिकवून ठेवण्याची परंपरा नसणे हा याहून अधिक मूलभूत स्वरूपाचा अडथळा असून तो सर्व वैज्ञानिक समाजांपुढे असतो. भारतीय वैज्ञानिकांना स्वकर्तृत्वाविषयी अधिक स्वाभिमान असता, तर त्यांना सामाजिक जबाबदारीची अधिक जाणीव झाली असती.

## उपसंहार

खरोखरच समस्या कोठल्या आहेत हे दाखवून देण्यात डॉ. रहमान यांचा आक्षेप बरोबर आहे, असे म्हणता येत नाही. एकमेकांपासून दुरावलेल्या वैज्ञानिकांची स्थिती स्पष्ट करण्यासाठी संशोधनासाठीचे विषय निवडण्याच्या पुष्कळ कसोटचा निरुपयोगी ठरू शकतात. त्यामुळे एखाद्या विशिष्ट समाजात वैज्ञानिक कार्य स्वतःच्या बळावर चालत राहण्यासाठी वैज्ञानिक कसोटचा व मूल्ये यांचे भान असलेला वैज्ञानिक समाज आवश्यक असतो. वैज्ञानिकांच्या संख्येच्या बाबतीत जगात भारताचा तिसरा क्रमांक आहे. मात्र यातून या व्यवसायाची (वैज्ञानिक) मूल्ये व बांधिलकी (जबाबदाऱ्या) यांना वाहून घेणारा एक वैज्ञानिक समाज निर्माण होऊ शकत नाही. भारतातील विज्ञानाच्या कुंठित व काठावरच्या (वरवरच्या) स्वरूपामागील कारण येथील दुबळा, विस्कळीत व संदिग्ध वैज्ञानिक समाज हे देतात. यामुळे वैज्ञानिकांना संशोधनासाठी उचित विषयनिवडीसाठी पाळाव्या लागणाऱ्या वैज्ञानिक कसोटचा व प्रमाण कार्यपद्धती यांविषयी व्यक्तिगत पातळीवर आस्था वाटत नाही. भारतीय वैज्ञानिकांमधील राजकीय बांधिलकीचा अभाव किंवा भारतीय समाजातील वैज्ञानिक वृत्तीची उणीव यांद्वारे याचे स्पष्टीकरण देता येऊ शकत नाही. जागतिक संशोधनाच्या दृष्टीने भारतातील अगदी थोडेच वैज्ञानिक संशोधन महत्त्वाचे आहे व त्यापासून भारतीय समाजाला काही विशिष्ट लाभ होतो असेही नाही. याची भारतीय वैज्ञानिकांना जाणीव आहे; पण या परिस्थितीतून बाहेर पडण्याचा उपाय ते शोधू शकत नाहीत.

## संदर्भ

१. 'ऑन द थ्रेशोल्ड ऑफ सुपरपॉवर', इंडियन एक्स्प्रेस, २९ मे १९८१.

२. डिपार्टमेंट ऑफ सायन्स अँड टेक्नॉलॉजी, रिसर्च अँड डेव्हलपमेंट स्टॅटिस्टिक्स, १९७८–७९ (नवी दिल्ली, भारत सरकार), पृष्ठ ७३.

३. वरील २ क्रमांकाचा संदर्भ, पृष्ठ ६३.

४. भाणेजा, बलवंत, "पार्लमेंटरी इन्फ्ल्युअन्स अँड सायन्स पॉलिसी इन इंडिया', मिनर्व्हा, XVII, I (स्प्रिंग १९७९), पृष्ठे ७९–७९.

५. साहा, एम. एन., "बेसिक प्रिन्सिपल्स ऑफ ऑर्गनायझेशन ऑफ सायंटिफिक रिसर्च" 'सायन्स अँड कल्चर', IX, 5 (नोव्हेंबर १९४३), पृष्ठे १७३–१७८; डोग्रा, भरत, "अवर लँग्विशिंग लॅब्ज" (सोशल चेंज पेपर १९८०) (नवी दिल्ली, १९८०); मोहन, डी. "ए सी ऑफ मिडिओक्रिटी", 'सेमिनार' २५८ (फेब्रुवारी १९८१), पृष्ठे ३६–४२.



अनुक्रमणिका






६. मोरोव्हसिक, एम. जे., ' सायन्स डेव्हलपमेंट : द बिल्डिंग ऑफ सायन्स इन लेस डेव्हलप्ड कंट्रीज ' (ब्लूमिंग्टन, इंडियाना, पासितान, १९७८); डेडिजर, स्टिव्हन, " अंडरडेव्हलप्ड सायन्स इन अंडरडेव्हलप्ड कंट्रीज ", मिनर्व्हा, II, I (ऑटम, १९६३), पृष्ठे ६१–८१.

७. वरील पाहणी सप्टेंबर १९७९ ते एप्रिल १९८० दरम्यान करण्यात आली व वरील दहा संस्थांमधील एकूण ७८ वैज्ञानिकांची मुलाखत घेण्यात आली.

८. सी. एस. आय. आर., " ओपिनियन सर्व्हे ऑफ सायंटिस्ट्स अँड टेक्नॉलॉजिस्ट्स " रेफ. नं. ९ (नवी दिल्ली, भारत सरकार, १९६७), पृष्ठे ३२–५४; अरुणाचलम्, एस्., " इंडियन पब्लिकेशन्स : इट्स रेलेव्हन्स टू इंटरनॅशनल सायन्स ", ' सायन्स टूडे ', (मार्च १९७९) पृष्ठे ४५–५०.

९. अँडर्सन, आर. एस्. " बिल्डिंग सायंटिफिक इन्स्टिटयूशन्स इन इंडिया : साहा अँड भाभा ", (मॉंट्रियल : मॅक्गिल युनिव्हर्सिटी प्रेस, १९७८), पृष्ठ ११८.

१०. " हॅव सायन्स अँड टेक्नॉलॉजी रीच्ड द पीपल ?", इकॉनॉमिक टाइम्स, १६ ऑगस्ट १९८८.

११. रहमान, ए. " ए कॉंटेक्स्चुअल रोल फॉर सायंटिस्ट्स अँड टेक्नॉलॉजिस्ट्स " ' इकॉनॉमिक अँड पॉलिटिकल वीक्ली,' VII, (२ जानेवारी १९७१), पृष्ठे ४९–५१.

* *








# वनोपासना *

## तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

श्री. गजानन शं. खोले यांनी "ज्ञानेश्वरीतील वनश्री" ही लेखमाला लिहून प्रसिद्ध केली. ही लेखमाला त्यांनी योग्य अशा वैचारिक आंदोलनाच्या संदर्भात लिहिली आहे. आज जगातच, विशेषतः पश्चिमी राष्ट्रांमध्ये हिरवळ वाढवा, तिचा नाश टाळा असा प्रचार अनेक वर्षे सुरू आहे. जंगलांचा नाश होत आहे, तो मनुष्यजातीला अपायकारक ठरणार आहे, म्हणून अनेक राजकीय पक्ष युरोपात आपल्या राजकीय कार्यक्रमांत जंगलतोडीच्या विरोधी जबरदस्त प्रचार करू लागले आहेत. आपल्या येथेही पर्यावरणाचे प्रदूषण थांबवा आणि जंगले वाढवा असा प्रचार होऊ लागला आहे. त्याचे नेते महाराष्ट्रातील श्री. मोहन धारिया हे आहेत. हा जंगलाचा महिमा प्राणिजीवन आणि मनुष्यजीवन यांच्या दृष्टीने अत्यंत लक्षात ठेवण्यासारखा आहे.

भारतीय संस्कृतीमध्ये वनमाहात्म्य धार्मिक आणि तात्त्विक विचारसरणीमध्ये जोपासले आहे. सगळ्या पुराणांमध्ये, नैमिषारण्यामध्ये सूत प्राचीन इतिहासाच्या कथा सांगत आहे, अशा तऱ्हेची प्रस्तावना असते. नैमिषारण्यामध्ये सहस्रवर्षीय सत्रात कथा सांगतात. सूत प्रायोपवेशन करणाऱ्या परिक्षित राजाला शुकमुनींचे भागवतपुराण सांगण्यास सुरुवात करतात. त्यामध्ये भगवान श्रीकृष्णाचे जीवनचरित्र सांगितले आहे. नैमिषारण्याच्या द्वादशवर्षीय सत्रात सगळी पुराणे सांगितली गेली आहेत.

भारतीय आद्य वेदान्त तत्त्वज्ञान उपनिषदांमध्ये सांगितले आहे. ही उपनिषदे "आरण्यक" नामक वेदभागातील अखेरची प्रकरणे आहेत, म्हणून त्यांस वेदान्त म्हणजे "वेदातील अखेरचे प्रकरण" अशी संज्ञा आहे. आरण्यक शब्दाचा अर्थ आद्य शंकराचार्यांनी "बृहदारण्यक" या उपनिषदात "अरण्यामध्ये ज्यांचे पठण होते, वाचन होते ते आरण्यक होय" असा सांगितला आहे. उपनिषदांचे वाचन गावात न करता अरण्यात करावे असा एक निर्बंध प्राचीन काळी होता. कारण अरण्य हे अत्यंत पवित्र मानले गेले.

वृक्षवनस्पती, जलाशय, पुष्पे आणि फळे यांचे आकर्षण प्राण्यांना आणि मनुष्यांना निसर्गतःच असते. एखादी चांगली आकर्षक वस्तू असली म्हणजे इंग्लिशमध्ये "ॲन ॲपल ऑफ माय आय्"– "माझ्या डोळ्यांना आवडणारे सफरचंद" अशा अर्थाची ही म्हण वापरतात. गुरूंच्या आणि देवांच्या पायांना आणि हातांना चरणकमल आणि हस्तकमल अशा तऱ्हेचा निर्देश सहज करत असतात. भक्ताला हृदयात ईश्वराचे दर्शन होते असे जेव्हा म्हणतात, तेव्हा हृदयाला हृदयकमळ असे संबोधिले जाते.

बहरलेल्या शेतीवर मनुष्यसमाज जगलेला आहे. त्यामुळे देहाला क्षेत्र म्हणजे शेत आणि देहातील आत्म्याला क्षेत्रज्ञ म्हणजे शेतकरी असे रूपकात्मक वर्णन फार प्राचीन काळापासून सुरू आहे. भगवद्गीतेत क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांचे ज्ञान झाले म्हणजे ईश्वराचे ज्ञान होते, असे भगवान श्रीकृष्ण म्हणत आहे. 'केनोपनिषद' म्हणून एक छोटेसे परंतु ब्रह्मविद्येच्या दृष्टीने संक्षिप्त रीतीने मौलिक सिद्धान्त व्यक्त करणारे उपनिषद आहे. त्या उपनिषदात परमेश्वराची "तद्वनमित्युपासितव्यम्" – "ते वन आहे अशी उपासना करावी", असा आदेश दिला. स्वामी रामदासांनी भक्ताला "मनाचे श्लोक" या प्रकरणात "सदा सेवी आरण्य तारुण्यकाळी मिळे ना कदा कल्पनाचेनि मेळी" असा उपदेश केला आहे. मनुष्यजातीची उत्पत्ती आणि वाढ दीर्घकालपर्यंत जंगलातच होत होती. त्याच्या शरीराला जो सुंदर आकार आला आहे, त्याची इंद्रिये म्हणजे डोळे, कान, जिव्हा, त्वचा, नाक ही पंचेंद्रिये जंगलांमध्ये दीर्घकालपर्यंत झालेल्या पर्यटनात आणि संघर्षात निर्माण झाली आहेत. अन्न शोधण्याकरिता आणि

* श्री. गजानन शं. खोले यांच्या "ज्ञानेश्वरीतील वनश्री" या लेखसंग्रहाची प्रस्तावना.






शिकार करण्याकरिता मनुष्यजातीला फार भटकावे लागे. हे भटकणे कमी करणे आणि थांबविणे याची गरज प्रथमत: स्त्रीला वाटली. कारण गर्भार राहिल्या-नंतर अखेरचे तीन महिने भटकणे कष्टाचे होते. आणि संतती झाल्यावर काही दिवस एका ठिकाणी डांबून राहावे लागते. त्यामुळे जागच्याजागी, आसपास, जवळच अन्नप्राप्ती कशी होईल याचा विचार स्त्रीला सुचला. बी-बियाण्यांचा ती संचय करू लागली. सुपीक जमिनीचा अंदाज घेऊ लागली आणि घर बांधू लागली. गृहस्थ पुरुषापेक्षा गृहिणी ही गृह या वास्तूची आणि संस्थेची निर्माती झाली. मनुष्यजातीच्या इतिहासातील हे पहिले प्रकरण आहे. हे प्रकरण अरण्यातील आहे. भारतात सर्वत्र चांगली मोठी अरण्ये होती, म्हणून वय पन्नाशी वा साठीला आले म्हणजे वानप्रस्थाश्रम सुसंस्कृत लोक स्वीकारत असत आणि प्रजोत्पादन थांबवत असत. मोह होऊ नये असा आदेश देऊन धर्मशास्त्रकारांनी वानप्रस्थाला पत्नीसह वनात राहण्याची परवानगी दिली. प्रजोत्पादनाच्या क्रियेचा निषेध केला म्हणून ऋषि-मुनींच्या आश्रमाचे वर्णन वाचत असताना वैराग्यशील मुनींचे वर्णन आपण वाचतो.

भारतातील जंगलांचा नाश हजारो वर्षे बेदरकार सुरू आहे; गेल्या दोनशे वर्षांत त्याचा अतिरेक झाला. आता इमारती-लाकूड अत्यंत महाग झाले आहे. म्हणून भारताच्या आर्थिक जीवनात घरबांधणी ही फार महाग झाली आहे. त्यामुळे सिमेंटकाँक्रिटची जंगले म्हणजे शहरे दिसू लागली. ही जंगले डोळ्याला खुपतात. त्यामुळे शहरे तापतात. उन्हाळ्यामध्ये घरामध्ये आराम मिळत नाही. अशा परिस्थितीतून बाहेर पडण्याकरिता भारतीय आर्थिक जीवाला वनोपासना अत्यंत आवश्यक झाली आहे. या वनोपासनेला श्री. खोले यांचा हा लेखसंग्रह प्रेरणा देईल, अशी अपेक्षा व्यक्त करून ही छोटीशी प्रस्तावना संपवितो.

* *

## साभार पोच

* **प्रबोधन उद्यासाठी**– मुरलीधर गंधे; चेतश्री प्रकाशन, मुक्ताई, अंमळनेर–४२५४०१; १९९०; पृ. २४५; किं. ८० रुपये.
* **विज्ञान आणि वैज्ञानिक**– जयंत नारळीकर; श्रीविद्या प्रकाशन, २५० शनिवार, पुणे–४११०३०; १९९०; पृ. १०५; किं. ३५ रुपये.
* **रंगसावल्या**– एस. डी. इनामदार; प्रतिमा प्रकाशन, १३५९, सदाशिव पेठ, पुणे– ४११०३०; १९८९; पृ. २१२; किं. ७० रुपये.
* **कोल्हापूर जिल्हा** ( गॅझेटिअर )– संपादक– कि. का. चौधरी; दर्शनिका विभाग, महाराष्ट्र शासन; १९८९; पृ. ७४०; किं. २०० रुपये.
* **माझी वाकळ**– रत्नाजी आगवणे; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर, पुणे– ३०; १९९०; पृ, १४७; किं. २५ रुपये.
* **ब्रह्मावर्त**– माधव साठे; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर, पुणे–३०; १९९०; पृ. २००; किं. ४० रु.
* **चरित** (कवितासंग्रह)– केशव मेश्राम; प्रकाशक- नामदेव ढसाळ; आंबेडकर प्रबोधिनी, हाजीकासम चाळ, शाहीर अमरशेख मार्ग, जेकब सर्कल, मुंबई– ४०० ०११; १९८९; पृ. ५३; किं. ३५ रु.
* **मरणमाळा** ( कथासंग्रह )– केशव मेश्राम; सुरेश एजन्सी, २०५ शुक्रवार पेठ, पुणे–४११ ००२; १९८८; पृ. ११७; किं. ४० रुपये.
* **आमनेसामने** (कथासंग्रह)– केशव मेश्राम; सुरेश एजन्सी, २०५ शुक्रवार पेठ, पुणे–४११ ००२; १९८९; पृ. १११; किं. ४० रुपये.

अनुक्रमणिका






# *भाषाविकास व मराठी भाषा : समाजव्यवहार

वसंत स. खोकले

मराठी भाषेच्या विकासाचा समाजव्यवहाराच्या संदर्भात विचार करीत असताना मराठी भाषेच्या वैशिष्टयांचा विचार करणे अपरिहार्य ठरते. त्यातील काही ठळक वैशिष्टयांचा विचार प्रस्तुत लेखातून करावयाचा आहे. तत्पूर्वी भाषाविज्ञानाची भाषाविकासाविषयीची भूमिका समजून घेणे आवश्यक आहे.

## भाषाविज्ञान

भाषा ही एक सतत परिवर्तनशील अशी व्यवस्था आहे, अशी भाषाविज्ञानाची एक प्रमुख मान्यता आहे. अशा प्रतिक्षणी होणाऱ्या परिवर्तनाची भाषावैज्ञानिक बहुधा साधी दखलसुद्धा घेत नाही. अशा परिवर्तनाकडे ते मुक्त किंवा स्वच्छन्द परिवर्तन होय असे म्हणून तो दुर्लक्ष करतो. उदाहरणार्थ, 'नागपूर' हा शब्द आपल्या आयुष्यात आपण दिवसातून अनेकदा उच्चारीत असतो परंतु प्रत्येक वेळी आपला आताचा उच्चार पूर्वीच्या व पुढे होणाऱ्या कोणत्याही उच्चारापेक्षा वेगळाच राहणार. 'नागपूर' ह्या शब्दात न् आ ग् प् ऊ र् ध्वनीसापेक्ष विच्छेदाप्रमाणे सहा ध्वनी आहेत. यांपैकी प्रत्येक ध्वनीच्या उच्चारप्रक्रियेतील घटकात पडलेल्या किंचित फरकाने संपूर्ण शब्दच वेगळा उच्चारला जातो. असा फरक आपल्या उच्चारात नेहमीच पडत असतो. म्हणून अशा प्रकारच्या परिवर्तनाची दखल भाषावैज्ञानिक घेत नसतो व तशी घेण्याची तात्त्विक गरजही नसते. अशा प्रकारच्या अनिर्बंध परिवर्तनाची दखल भाषावैज्ञानिक घेऊ लागला तर कोणतीही भाषा हाताळणेच अशक्यप्राय होऊन बसेल. म्हणून व्यावहारिक दृष्टीने तर ही बैठक योग्य आहेच; पण तात्त्विक दृष्टीनेही ती तितकीच योग्य आहे. अशा कोटीतील उच्चारपरिवर्तनाने भाषेच्या अभिव्यक्तीच्या अंगात काहीही फरक पडत नसतो. भाषा म्हणजे ध्वनी आणि अर्थ यांचा सहसंबंध ( correlation )असे चॉम्स्की हा अमेरिकन भाषावैज्ञानिक म्हणतो. तेव्हा उच्चारातील अशा प्रकारचे स्वच्छन्द परिवर्तन ( free variation ) त्याच्या अर्थातील परिवर्तनाशी संबंधित नसल्याने भाषेच्या कक्षेतच मुळी बसत नाही.

'नागपूर' शब्दाचा आणखी एक उच्चार सर्वसामान्यपणे आढळतो तो असा न् आ क् प् ऊ र्. या उच्चारात मध्यवर्ती सघोष व्यंजन ग् चा बदल अघोष व्यंजन क् मध्ये झालेला आहे. अधिक बारकाईने लक्ष देऊन चिकित्सा केल्यानंतर असे आढळते, की हे परिवर्तन अनिर्बंध नाही तर संदर्भबद्ध आहे कारण परवर्ती अघोष प् च्या संसर्गाने पूर्ववर्ती सघोष ग् अघोष क् मध्ये बदललेला आहे. अशा दर्जाच्या परिवर्तनाची दखल भाषाविज्ञान घेते व तशी घेणे आवश्यकही आहे कारण हे परिवर्तन नियमित स्वरूपाचे आहे. सर्वसाधारणपणे भाषाविज्ञान सुशिक्षित किंवा प्रमाणभूत भाषेचा अभ्यास करीत असल्याने व वरील बदल सुशिक्षित उच्चारांतही आढळत असल्याने या परिवर्तनाची दखल घेणे भाषाविज्ञानाच्या तत्त्वाप्रमाणे क्रमप्राप्तच ठरते.

## समाजभाषाविज्ञान

'नागपूर' या शब्दाच्या उच्चाराचे आणखी काही प्रकार ऐकण्यात येतात ते आपण पाहू या. नागविदर्भात 'नाप्पूर', 'नांगपूर' व 'नांपूर' असे तीन वेगळे उच्चार प्रस्तुत लेखकाने ऐकले आहेत. उच्चाराचे हे प्रकार जिला आपण 'नागपुरी सुशिक्षित बोली' म्हणतो तिच्यात नक्कीच मोडत नाहीत. अशा परिवर्तनाची दखलसुद्धा भाषाविज्ञान घेत नसते. भाषाविज्ञानान्तर्गत बोलीभाषांचा अभ्यास करताना ज्या

* नागपूर विद्यापीठाच्या पद्व्युत्तर मराठी विभागातर्फे आयोजित 'ऑक्टोबर व्याख्यानमाले' मध्ये दिनांक १२ नोव्हेंबर, १९८१ रोजी प्रस्तुत लेखकाने सदर विषयावर व्याख्यान दिले होते. त्याचेच संशोधित व परिवर्धित रूप म्हणजे प्रस्तुत लेख.

अनुक्रमणिका

बोलीभाषांमध्ये ही रूपे आढळतात त्या बोलीभाषांचा अभ्यास करताना ह्या रूपांची दखल अवश्य घेता येईल. ही तीन रूपे जर वेगवेगळ्या बोलीभाषेत आढळत असतील तर प्रत्येकाचा त्या त्या बोलीच्या संदर्भातच विचार करता येईल, एकत्रितपणे नाही. वरील तिन्ही रूपे प्रमाणभाषेतील नसल्यामुळे व स्वच्छंद वैविध्यामुळे भाषाविज्ञानात दखलपात्र ठरत नाहीत.

वरील तिन्ही रूपांच्या वैविध्यात जरी भाषिक अर्थवैविध्य नसले तरी एका वेगळ्या सूक्ष्म दृष्टीने पाहिल्यास त्यात सामाजिक अर्थ आहे. आणि म्हणूनच वरील रूप-वैविध्य प्रथमक्षणी वाटते तेवढे स्वच्छंद नाही. जसा 'नागपूर' हा शब्द प्रमाणभाषेचा (standard language) व सुशिक्षित बोलीचा म्हणजेच पर्यायाने समाजातील सामान्यतः वरच्या दर्जाच्या लोकांचा; तसेच 'नाप्पूर' इत्यादी शब्द अवप्रमाण किंवा न्यूनप्रमाण (substandard) भाषेचे व अशिक्षित किंवा अर्ध-शिक्षित बोलीचे आणि पर्यायाने समाजातील सामान्यतः खालच्या स्तरातील लोकांचे. वरील रूपांच्या बदलातून शाब्दिक अर्थपरिवर्तन जरी होत नसले, तरी बोलणाऱ्या व्यक्तीचा सामाजिक दर्जा व्यक्त होत असल्याने सामाजिक अर्थ-परिवर्तन होत असतेच. थोडक्यात असे म्हणता येईल, की वरील रूप-वैविध्य एककालिक भाषावैज्ञानिक (synchronic linguistics) दृष्टिकोणातून निरर्थक व त्याज्य जरी असले तरी ते समाजभाषावैज्ञानिक (sociolinguistic) दृष्टिकोणातून अर्थपूर्ण व अभ्यासपात्र आहे.

प्रस्तुत लेखातील विषयांचे सार्थ मंथन करण्यासाठी समाजभाषाविज्ञानाची भाषेविषयीची भूमिका समजून घेणे आवश्यक आहे.

कोणत्याही एका समाजात अनेक घटक (component) समूह असतात. संपूर्ण समाजाची भाषा जरी एक असली तरी कालपरत्वे प्रत्येक घटकसमूहाच्या भाषेत फरक पडत असतो. येथे भाषिक एकता किंवा वैविध्य अस्तित्वात का येते, याची कारणमीमांसा करणे आवश्यक वाटते.

प्रत्येक समाजातील व्यक्तिव्यक्तींमध्ये आपापसातील देवाण–घेवाण त्या समाजातील बाहेरच्या व्यक्तींपेक्षा अधिक प्रमाणात होत असते. यातूनच समान हितसंबंध विकसित होऊन परस्परसंपर्क घनिष्ठ होतात. या संपूर्ण समाजाला व्याप्त करून विकसन पावणाऱ्या समानतेपासून भाषा कशी बरे सुटेल? व्यक्ती एकमेकांसारख्या बोलू लागतात. परिणामतः एका समाजाची भाषा एकजिनसी बनते. याच न्यायाने समाजातील घटकसमूहांच्या भाषेत वैशिष्टचपूर्ण सारखेपणा येतो. पर्यायाने जिथे आपण समाजाच्या भाषेला भाषा म्हणतो तिथेच घटकसमूहांच्या विविध भाषांना भाषा न म्हणता 'बोलीभाषा' किंवा 'बोली' असे म्हणतो. याच न्यायाने एका समाजाची भाषा अशाच पण इतर समाजांच्या भाषांपेक्षा वेगळी का दिसून येते याचाही उलगडा होतो. थोडक्यात सांगायचे म्हणजे समाज किंवा समूहनिष्ठ दळणवळणाची घनताच (density of communication) अनुक्रमाने एक भाषा किंवा तिच्या अनेक बोली विकसित करण्यास कारणीभूत होत असते.

सामाजिक दृष्टिकोणातून भाषेचा अभ्यास करावयाचा असेल, तर भाषेचा व तिच्या बोलींचा साकल्याने विचार झाला पाहिजे. असा विचार करीत असताना ती भाषा व त्या त्या बोलींचा व्याकरणाच्या दृष्टीने विचार अनुषंगाने करावाच लागेल परंतु समाजव्यवहारामध्ये त्या भाषा व बोलींचा सहभाग कसा असतो व त्याचे प्रयोजन काय असते हे सूक्ष्मतेने पाहणे आवश्यक आहे. प्रमाणभाषा असो किंवा बोली असो, ती समाजाच्या माध्यमातूनच वापरली जाते व म्हणूनच त्यात विविधता येते. प्रत्येक भाषा किंवा बोली हिला एकाकी पाडून व समाजव्यवहारापासून विच्छिन्न करून केलेल्या तिच्या अभ्यासाला दळण-वळणाची सांकेतिक पद्धती (symbolic system of communication) म्हणून तिचे गुणविशेष जाणून घेण्यासाठी करण्यात येणाऱ्या प्रयत्नांना वैज्ञानिक मूल्य आहे हे निर्विवाद आहे. तरीही सामाजिक प्राणी म्हणून प्रतिक्षणी वावरणाऱ्या सामान्य माणसाच्या भाषेचा असा एकाकी अभ्यास आधी राक्षसी कृती (किंवा विकृती म्हटल्यास अधिक उपयुक्त ठरेल) करून नंतर तिचा अभ्यास करण्यासारखी आहे. सामाजिक संदर्भ वगळून केलेली भाषेची संकल्पना म्हणजे जर्मन लोककथेतील फ्रँकेंस्टाईन नावाच्या वैज्ञानिकाने तयार केलेल्या राक्षसासारखी होय. हा राक्षस ज्याप्रमाणे त्याच्या निर्मात्यालाच गिळंकृत करावयास निघाला होता त्याचप्रमाणे सामाजिक संदर्भ



अनुक्रमणिका

सोडून प्रयुक्त केलेली भाषाही त्याच्या निर्मात्याला (बोलणाऱ्याला) गिळंकृत केल्यावाचून राहात नाही हे प्रत्यक्ष अनुभवलेल्या घटनेवरून सांगावेसे वाटते.

### सर्वनामाचा नामी कहर

एकदा कॉलेजमध्ये असताना आम्ही चार-पाच मित्र मिळून बिलासपूरहून राऊरकेलाला जायला निघालो. गाडीत आमच्या समोरच्या बाकावर पांढरे शुभ्र धोतर व कुर्ता असा बंगाली पोषाख केलेले पन्नाशीच्या घरात असलेले सद्‌गृहस्थ बसले होते. त्यांनी त्यांच्या मोडक्या-तोडक्या किंबहुना 'बंगाली' हिंदीत आमची विचारपूस केली. त्यांचे ते भयानक हिंदी ऐकून असे वाटले की त्यांच्याशी बंगालीतूनच बोलावे. लहानपणी बंगाली-भाषी कुटुंब शेजारी राहात असल्याने जुजबी बंगाली बोलण्याचा सराव होता. तरीपण अस्सल बंगाली माणसाशी बिलासपुरी बंगालीत बोलण्यास मन धजवेना. पण आमच्या एका मित्राचे तसे नव्हते. त्याला दक्षिणपूर्व रेल्वे कॉलनीतील बंगाली लोकांचा बराच सहवास लाभल्याने त्याच्या स्वतःच्या बंगालीवर त्याचा विश्वासही दांडगा होता. त्याने तडक बंगाली बोलावयास सुरुवात केली. त्यांची विचारपूस करताना त्याने त्यांना बंगालीतील 'तुमी' ह्या मध्यमपुरुषी पण जिव्हाळ्याच्या किंवा परिचय-सूचक (familiar) सर्वनामाने संबोधित केले. पारिभाषिक रीत्या 'संदर्भित केले' असे म्हणणे अधिक उपयुक्त ठरेल. सुरुवातीला त्या बंगाली सद्‌गृहस्थांनी त्याच्या प्रश्नांना 'हू, हो, नाही' अशी त्रोटक उत्तरे दिली. पण संभाषणात विशेष रस घेतला नाही. त्याच्याकडे न पाहता खिडकीच्या बाहेरच बघत राहिले. त्यांच्या या वागण्यावरून त्याने अभिप्रेत बोध न घेता बंगाली बोलावयाच्या अति उत्साहापायी संभाषण सुरूच ठेवले व पुन्हा पुन्हा त्यांच्याकरिता 'तुमी' या सर्वनामाचा प्रयोग तो करीतच राहिला. संभाषण बंद करण्याच्या आमच्या इशाऱ्याकडेही त्याने पूर्णपणे दुर्लक्ष केले आणि शेवटी स्वतःवरच अनर्थ ओढवून घेतला. त्या बंगाली सद्‌गृहस्थांचा राग अनावर झाला व बॉम्बचा स्फोट व्हावा तसे शब्द आमच्या कानी आदळले, "तुमी, तुमी, तुमी की कोरचे, आपनी बोलो आपनी." त्याच्या बंगालीवरील हे सर्टिफिकेट दिल्यानंतर ते निर्वाणीचे आपल्या खास हिन्दीत बोलले, 'तुमी बांगला नाई जानता तो आपना डोर्टी माऊथ बोंद कोरो" व त्याचे बंगाली पार बंद पाडले.

वरील घटनेत आमच्या मित्राने बंगालीचा वापर करताना सामाजिक संदर्भ सोडला नव्हता. त्याचा तो फक्त चुकला होता. सामाजिक संदर्भ चुकलेल्या भाषेनेच त्याला पूर्णपणे गिळंकृत केले होते तर मग सामाजिक संदर्भविहीन भाषेच्या वापराने कोणता दुर्धर प्रसंग ओढवेल याची कल्पनाच केलेली बरी. या ठिकाणी "तुमी" या सर्वनामाचा वापर त्या बंगाली सद्‌गृहस्थाला इतका अपमानास्पद का वाटावा याचा विचार करायला पाहिजे.

### भाषा व सामाजिक बोली

बंगाली भाषेत मध्यमपुरुषवाची तीन सर्वनामे साधारणतः आढळतात. ते "तुई", "तुमी" आणि "आपनी" असे आहेत. हे जरी प्रथमदर्शनी मराठीच्या "तू", "तुम्ही" आणि "आपण" यांच्याशी समांतर वाटत असले तरी ते तसे नाहीत. याचे प्रमुख कारण असे की मराठी सभ्य भाषेत जसा या तिन्हींचा प्रयोग होतो तसा बंगालीतील सभ्य भाषेत या तिन्हींचा प्रयोग होत नसतो. "तुई" हा शब्दच जणू सभ्य भाषेत नाही. "तुमी" आणि "आपनी" ही दोनच सर्वनामे सभ्य भाषेत आहेत. सामाजिक अर्थाने तिला सभ्यभाषा म्हणण्याऐवजी **सभ्यबोली** म्हणणे अधिक सयुक्तिक होईल. हिला आपण "आपनी बोली" म्हणू या. बोलचालीच्या भाषेत "आपनी" ऐवजी "आपुन"-देखील उपयोगात आणतात; परंतु सभ्य व वाङ्‌मयीन भाषेत "आपनी" हाच प्रयोग रूढ आहे. दुसऱ्या बोलीला आपण "तुई बोली" म्हणू या. यात "तुई" आणि "तुमी"चा समावेश होतो. या बोलीचा वापर सभ्येतर करीत असतात. वरील घटनेतील बंगाली सद्‌गृहस्थाला "तुमी" अपमानास्पद वाटले याचे कारण त्याच्या सभ्यबोलीत "तुमी" हे सामान्य सर्वनाम होते, आदरसूचक नव्हे. त्याच्या बोलीप्रमाणे "आपनी"चा प्रयोग अनिवार्य होता. सदर घटनेतील आमच्या मित्राने "तुमी" वापरून सभ्यबोलीऐवजी सभ्येतर बोली वापरली व सामाजिक संदर्भ चुकविला म्हणून खटका उडाला. सभ्य हिंदीतदेखील "आप" बोलीमध्ये "तुम" आणि "आप" ही दोनच सर्वनामे समाविष्ट होतात. त्यांपैकी "आप" हेच आदरसूचक. हिंदीच्या "तू" बोलीमध्ये "तू", "तुम" आणि "आप" ही तिन्ही सर्वनामे येतात पण ही बोली सभ्येतरच म्हणावी लागेल. हिंदीची एक बोली तर अशी आहे

जिच्यात " आप " शिवाय दुसरे सर्वनामच नाही. हिला आपण **अतिसभ्य**, विशिष्टसभ्य किंवा **शिष्टसभ्य** बोली म्हणू या. मराठीतदेखील अतिसभ्य प्रकार आढळतो. मराठेशाहीतील सरदार-दरकदार व राजघराण्यात गुडघ्याएवढ्या मुलांनादेखील " आपण " किंवा " तुम्ही " असे आदरार्थी सर्वनाम वापरीत असत. असा प्रयोग मराठेशाहीवरील कथा-कादंबऱ्यांत आणि नाटकांत मोठ्या प्रमाणात आढळतो. प्रस्तुत लेखकाने अशा प्रकारचा आजही होत असलेला प्रयोग सागर-इन्दूर प्रदेशांत अनेकदा ऐकला आहे. या समूहाच्या मराठी बोलीला " आपण " बोली असे संबोधणे योग्य ठरेल. अजूनही या बोलीचा वापर महाराष्ट्रातील जुन्या सरदार व राजघराण्यांतील आजच्या पिढीत होत असल्यास नवल वाटावयास नको. बंगाली व हिंदीच्या तुलनेत मराठीतील सभ्यबोलीतील परिस्थिती जरा वेगळी आहे. तिच्यात " तू ", " तुम्ही " आणि " आपण " ही तीन सर्वनामे आहेत व हे सर्व एकाच सभ्यबोलीत आहेत. " तुम्ही " आणि " आपण " दोन्ही आदरार्थी आहेत. " आपण " हे अ-परिचयसूचक म्हणून औपचारिक तर " तुम्ही " ही स-परिचयसूचक म्हणून अनौपचारिक असते. अनेक मराठीभाषी हिंदी " तुम "चा प्रयोग मराठीतील " तुम्ही "ला समकक्ष समजून आदरार्थाने करतात; परंतु तो खऱ्या हिंदीभाषिकांना फार खटकतो. नागपुरी हिंदी म्हणून जी बोली आहे तिच्यात " तू " आणि " तुम " ही दोनच सर्वनामे आहेत व तुम हेच आदरसूचक आहे. हिंदीभाषी प्रदेशात " तुम "चा आदरार्थी प्रयोग गहजब करेल यात संशय नको.

वरील चर्चेवरून असा निष्कर्ष काढता येतो, की जिला आपण भाषा म्हणतो, ती खऱ्या अर्थाने अनेक सामाजिक बोलींचा समुच्चय असते. समाजव्यवहाराच्या दृष्टीने ती त्या त्या सामाजिक संदर्भातील बोलींच्या परिस्थितीसापेक्ष योग्य वापराने घडलेली असते. सामाजिक संदर्भ वगळून भाषेचा वापर शक्य नाही. अशा वापरातून भाषेची जडण-घडण होत असते.

भाषेचा सामाजिक संदर्भातून विचार करीत असताना आणखी एक मुद्दा लक्षात घेण्यासारखा आहे. सामाजिक दृष्टीने भाषेचा विचार करीत असताना जन्य-जनक संबंधाचा विचार करण्यात येत नाही. कोणताही भाषिक समाज (speech community) एका मांजरपाटासारखा असतो. त्यावर चितारलेले भाषिक चित्र बोली व भाषांच्या घटकसंबंधाने निर्मिलेले असते. प्रत्येक आकार व रंगाचे योग्य व नियोजित प्रयोजन व कार्य असते म्हणूनच त्याला 'चित्र' हे नामधेय प्राप्त झालेले असते. त्याचप्रमाणे प्रत्येक बोली व भाषा, मग ती ऐतिहासिक दृष्टया जननसंबंधाने नात्यातील असो वा नसो, त्या विस्तृत भाषाचित्राच्या घटक रूपाने सप्रयोजन अस्तित्वात असते. हे प्रयोजन प्राधान्याने सामाजिक असते. जर कुण्या एखाद्या घटकबोलीचे किंवा भाषेचे सामाजिक प्रयोजन उरले नाही, तर ती भाषा त्या चित्रातून पार पुसली जाईल. म्हणून कोणत्याही भाषिक समाजात एखाद्या घटकभाषेचे अस्तित्व व स्थान तिच्या त्यातील अन्य घटकभाषांशी असलेल्या जन्मसंबंधावर अवलंबून नसून तिच्या सामाजिक प्रयोजनावर अवलंबून असते. या अशा दृष्टिकोणातून यापुढे मराठी भाषेच्या काही ठळक वैशिष्टयांचा विचार करण्यात आला आहे.

## भाषाविकास व समाजव्यवहार

१) **मराठीची उत्पत्ती** : मराठी भाषेची उत्पत्ती समाजव्यवहारातून झाली आहे असे प्रस्तुत लेखकाचे ठाम मत आहे. इ. स. च्या ५०० वर्षे अगोदरपासून तर इ. स. ६०० पर्यंत उत्तर भारतातून दक्षिणापथात वसाहती करावयाच्या निमित्ताने आर्यांचे लोंढे येतच असावेत. उत्तरेकडील नृपतींच्या सैन्याबरोबर आणि विजयानंतरदेखील असंख्य लोक सध्याच्या महाराष्ट्राच्या भागात स्थायिक व्हावयास आलेले असावेत. त्या काळी ह्या भागात द्राविडी अथवा कोणती तरी द्रविड भाषा बोलणारे लोक राहात असत हे साधारणतः सर्वमान्य आहे. मराठीच्या विकासाच्या दृष्टिकोणातून तेलगू व कानडी भाषांचे महत्त्व असाधारण आहे. आज ज्या प्रदेशात मराठी बोलली जाते तो संपूर्ण प्रदेश मराठीच्या पूर्ववर्ती काळात ह्या दोन द्राविडी भाषांनी व्यापलेला होता हे सर्वश्रुत आहे. मराठीच्या उत्पत्ती व प्रसारापूर्वी कानडी भाषेचे क्षेत्र दक्षिणेत कावेरी नदीपासून ते उत्तरेकडे गोदावरी नदीपर्यंत असल्याचे काही विद्वानांचे मत आहे. काहींच्या मते गोदावरीच्या उत्तरेकडे खानदेशात सातपुडयापर्यंतदेखील कानडीचे क्षेत्र असावे असे दिसते. उदाहरणार्थ, 'ईर' म्हणजे 'पाणी' ह्या शब्दाची व्याप्ती खानदेशातही आहे. वऱ्हाडातील चंद्रपूर–गडचिरोली भागात 'इरई' व 'इरावती' ही



अनुक्रमणिका

नद्यांची नावे 'ईर' शब्दाची उत्तरेकडील व्याप्ती दर्शवितात. महाराष्ट्रात 'ईरावती' हे स्त्रीचे नावही कानडी व पर्यायाने द्रविड भाषांनी मराठीच्या विकासात केलेल्या योगदानाकडेच इंगित करते.

वसाहतीकरिता आलेल्या आर्यांचा व मूळच्या द्रविडांचा संबंध युद्धरूपाने व खऱ्या अर्थाने जीवनावश्यक वस्तूंच्या देवाण-घेवाणीच्या निमित्ताने आला असावा. हा संबंध दोघांच्या वसाहतीपासून मध्यवर्ती भागात बाजाराच्या रूपाने आला असावा. युद्ध संपल्यानंतर सैन्याच्या तळाजवळच हा व्यवहार जोरात चालत असावा. त्या काळी मराठीला पूर्ववर्ती अशी कोणती तरी अपभ्रंश भाषा वा बोली आर्यांची असावी. आर्यांचा दक्षिणेकडे व दक्षिणपूर्वेकडे जसजसा विस्तार होत गेला तसतसा पुढे तेलगूभाषी लोकांशी त्यांचा संबंध आला असावा. अशा प्रकारच्या मर्यादित सामाजिक संबंधातून विकसित झालेली 'बाजार भाषा' किंवा पारिभाषिक रीत्या म्हणावयाचे झाले, तर 'वाणिज्य-भाषा' ( pidgin ), हीच मराठीची बीज-भाषा असावी.

भारतीय भाषांपैकी 'वाणिज्य-भाषे'च्या बीजरूपाने विकसित होऊन पुढे नावारूपाला येणारी व आर्यभाषांमध्ये महत्त्वाचे स्थान मिळवून घेणारी उर्दू भाषा वरील मताचे समर्थनच करते. 'दक्खनी' या भाषेच्या वाङ्मयीन रूपापासून पुढे उर्दू विकसित झाली हे सर्वश्रुत आहे. 'उर्दू' या शब्दाचा अर्थ 'सैन्य' किंवा 'छावणी' हा होतो हे लक्षात घेण्यासारखे आहे. मुस्लिम आक्रमकांबरोबर इराकी, तुर्की, पर्शियन इत्यादी लोक पश्चिम आशियातून भारतात आले. त्यांचा संबंध आक्रमणाच्या व तदनंतरच्या वास्तव्याने पंजाब व दिल्ली ह्या प्रदेशांतील रहिवाशांशी आला. त्या काळी ह्या प्रदेशांत हिन्दीची पश्चिमी बोली व पंजाबीची बांगरू बोली बोलली जात असे. एकीकडे हिन्दी व पंजाबी व दुसरीकडे अरबी व फारसी यांच्या संपर्कातून विकसित झालेली बोली दिल्लीच्या बाजारातून सरसकट वापरण्यात येत असे. हिचे नाव "हिन्दी" किंवा "हिन्दवी" म्हणजे 'हिन्द किंवा भारताची अथवा हिन्दूंची भाषा' असे त्या काळीही प्रचलित झाले. हीच भाषा पुढे दक्षिणेवरील मोहिमेवर पाठविलेल्या मोगलांच्या सैन्याबरोबर सतराव्या शतकाच्या उत्तरार्धात दक्षिण हिन्दुस्थानात "जबान–इ–उर्दू" किंवा "छावणीची भाषा" आणि पुढे फक्त 'उर्दू' म्हणवून घेऊ लागली, (पहा : चॅटर्जी, पान १९७). दक्षिणेत याच भाषेत पुढे वाङ्मयनिर्मिती झाली व त्यातील भाषा 'दक्खनी' या नावाने ओळखली जाऊ लागली. 'उर्दू' ही विभिन्न भाषांच्या संदर्भात बाजारातील देवाण-घेवाणीच्या अगतिकतेपासून विकसित पावलेली संपर्क-भाषा आहे हा मुद्दा लक्षात घेण्यासारखा आहे.

सुदैवाने उर्दू ही भाषा मराठीच्या तुलनेत बरीच अलीकडची असल्याने तिचा दाखला दक्खनी वाङ्मयाच्या रूपाने उपलब्ध आहे. उर्दूच्या मानाने मराठी बरीच प्राचीन असल्यामुळे मराठीला बीजरूप असलेली वाणिज्य-भाषा लेखी दाखल्यांच्या कोणत्याही रूपाने उपलब्ध नाही. मराठी ही कोणत्या भाषेपासून उत्पन्न झाली किंवा तिचा उत्पत्ति-काळ कोणता याविषयी जरी वाद असला, तरी मराठी भाषेत भिन्न भाषांच्या वेगवेगळ्या तत्त्वांची सरमिसळ झालेली आहे याविषयी दुमत होणे शक्य नाही. या सरमिसळीची सुरुवात वाणिज्य-भाषेच्या रूपाने झाली याविषयीच प्रस्तुत लेखात प्रामुख्याने चर्चा करण्यात आली आहे. या वाणिज्य-भाषेला आधारभूत भाषा भारतीय आर्य-भाषाच होती याविषयीही दुमत होण्याचे कारण नाही.

द्रविड भाषिकांच्या आर्यीकरणानंतर बाजारातील मर्यादित संबंधापासून सुरू झालेला समाज-व्यवहार पुढे "रोटी-बेटी" व्यवहाराच्या पातळीपर्यंत गेला असावा. जी भाषा (pidgin) पूर्वी बाजाराच्या संदर्भापुरतीच मर्यादित होती तीच कालांतराने पुढच्या पिढ्यांची मातृभाषा (creole) झाली असावी. अशा प्रकारे एकजिनसी मराठी समाज व मराठी भाषा विकसित झाली असावी.

२) **मराठीची व्युत्पत्ती :** सर्वसाधारणपणे "महाराष्ट्री" या शब्दापासून "मराठी" या शब्दाची व्युत्पत्ती सिद्ध करण्यात येते. उदा., कृ. पां. कुलकर्णी यांचे हे विधान पहा, "माहाराष्ट्री ही तिच्या नावावरून महाराष्ट्राची भाषा असावी असे वाटते." (मराठी भाषा : उद्गम व विकास, पान १३२). या व्युत्पत्तीत अनेक अडचणी आहेत. पहिली अशी, की माहाराष्ट्री ही कधीच जनभाषा नव्हती. ती मुख्यत्वे करून प्राकृत वाङ्मयाची भाषा होती. फार फार तर ती शिष्टसम्मत भाषा म्हणून अस्तित्वात असेलही. दुसरी अडचण अशी, की ज्या काळी माहाराष्ट्री ग्रांथिक भाषा म्हणून नावारूपाला आली तो काळ







अपभ्रंशाचा काळ होता. ग्रांथिक भाषा म्हणून बोलल्या जाणाऱ्या अपभ्रंशावर तिचे दूरगामी परिणाम संभवू शकतात; परंतु तिच्यापासून बोलभाषा प्रसवू शकत नाही. आणि तिसरी अडचण अशी, की सध्या ज्या भूभागाला आपण 'महाराष्ट्र' म्हणतो त्या भागात माहाराष्ट्री कधी बोलली जात असेल किंवा नाही याबद्दलही वाद आहे. उदा., कृ. पां. कुलकर्णी यांचे हे विधान पहा : "विंध्य पर्वताच्या दक्षिणेस नर्मदेपर्यंतच्या प्रदेशास महाराष्ट्र देश म्हणत असत. तेव्हा ह्याच देशात माहाराष्ट्री भाषा चालत असावी असे म्हटल्यास सध्या त्या देशात बोलल्या जाणाऱ्या भाषांकडून पुरावा मिळत नाही... सध्या ज्या देशाला महाराष्ट्र म्हणतात त्या प्रांताची पूर्वीची भाषा माहाराष्ट्री नसावी." (मराठी भाषा : उद्‌गम व विकास, पान १३२) डॉ. मनमोहन घोष यांचे मत उद्‌धृत करताना डॉ. चॅटर्जी लिहितात की माहाराष्ट्री ही महाराष्ट्राच्या भाषेचे प्रतिनिधित्व करीत नव्हती. खरं तर ती भाषा म्हणजे शौरसेनीचे परवर्ती रूप होते... हे (भाषेचे) रूप दक्षिणेत नेण्यात आले जिथे तिने स्थानिक प्राकृतातून काही शब्द व रूपे घेतली. तिचा उपयोग त्या भागात वाङ्‌मयात करण्यात आला आणि दक्खनमधून, म्हणजे महाराष्ट्रातून, ती उत्तर भारतात काव्याचे उत्तम माध्यम म्हणून परत घेण्यात आली (पहा : चॅटर्जी, पान ९१). ह्या विधानावरून स्पष्ट होते की उत्तर भारतातील शौरसेनीच्या परवर्ती रूपापासून माहाराष्ट्रीचा विकास वाङ्‌मयीन माध्यम म्हणून झाला पण ती लोकभाषा कधीच नव्हती. उलट, लोकभाषा कोणती तरी दुसरीच स्थानिक प्राकृत होती हेही स्पष्ट होते. तेव्हा माहाराष्ट्रीपासून मराठीची उत्पत्ती व व्युत्पत्ती दोन्हीही तथ्यसम्मत व तर्कसम्मत नाहीत या विचारालाच बळकटी प्राप्त होते. कृ. पां. कुलकर्णीदेखील स्पष्टपणे म्हणतात की, 'मराठी भाषा अमुक एका प्राकृत भाषेपासून उत्पन्न झाली असे आपणास म्हणता येत नाही' तरीपण माहाराष्ट्रीचे महत्त्व प्रतिपादिताना ते म्हणतात की, "सर्व प्राकृत भाषा, अपभ्रंश व संस्कृत ह्या भाषांनी आपापल्यापरीने व प्रामुख्याने अपभ्रंश व संस्कृत ह्यांनी मराठीस जन्माला आणण्यास हातभार लावलेला दिसतो." डॉ. घोष यांच्या विधानावरून माहाराष्ट्री ही कधीही बोलभाषा नसल्याकारणाने मराठीच्या जन्माला कारणीभूत असू शकत नाही. परंतु त्यांचे पुढील कथन "निरनिराळ्या प्राकृत भाषा बोलणारे निरनिराळे समाज निरनिराळ्या काळी उत्तरेकडून आर्यावर्तातून अनेक कारणांमुळे महाराष्ट्रात आले व तेथे स्थायिक झाले. त्यांच्या संमिश्र बोलण्यानेच मराठी भाषा बनली" हे मराठीचा विकास वाणिज्य भाषेपासून झाला या मतालाच पोषक ठरते (पहा : कृ. पां. कुलकर्णी, पान १८४, ). या सर्वांवर ताण करणारी अडचण म्हणजे 'महाराष्ट्र' या शब्दाने सांकेतित केलेल्या भूभागाची व्याप्तीसुद्धा अनिश्चित होती. 'महाराष्ट्र' शब्दाचा उपयोग कधी दक्षिणापथाच्या अर्थाने (कुलकर्णी म. भा., पान १९८), तर कधी अश्मक, कलिंग व अपरान्त ही तीन 'महाराष्ट्रे' ह्या अर्थाने (कृ. पां. कुलकर्णी, म. भा., पान २०७), तर कधी विदर्भाच्या सहा नावांमधून एक या अर्थाने (कृ. पां. कुलकर्णी, म. भा., पान २०७), असा अनेकार्थी व म्हणूनच अनिश्चित आहे. अशा संदिग्ध परिस्थितीत या शब्दापासून सिद्ध झालेल्या 'माहाराष्ट्री' पासून 'मराठी' शब्दाची व्युत्पत्ती करून मराठीविषयी काहीही महत्त्वाचे कळू शकणार नाही. इतके असूनही या सर्वांचा मिळून महाराष्ट्र होत होता असे जरी गृहीत धरले तरी, त्या पुरातन काळी जेव्हा दळणवळणाची साधनेच फारशी नव्हती अशा महाविस्तीर्ण प्रदेशात एकच भाषा बोलली जात असे अशी कल्पनादेखील ग्राह्य होणे शक्य नाही. असे असूनदेखील 'महाराष्ट्र' व 'माहाराष्ट्री' या संस्कृत शब्दांपासून 'मराठी' अथवा 'मराठा' या शब्दांची व्युत्पत्ती करण्याची वृत्ती पुन्हा पुन्हा उसळी मारून वर येते व 'मगधातून जे लोक आले ते महाराष्ट्रीय होत. या महाराष्ट्रीय शब्दाचाच अपभ्रंश महरट्ट असा होतो' (कृ. पां. कुलकर्णी, म. भा., पान २१०) या अशा उताऱ्यातून व्यक्त होते.

वरील अडचणींशिवाय भाषाशास्त्रीय अडचणीसुद्धा कमी नाहीत. 'महाराष्ट्र' पासून 'महरट्ट' पर्यंतचा रूपसिद्धीचा प्रवास विशेष क्लिष्ट किंवा अडचणीचा नाही. अडचणी पुढे आहेत, विशेषतः 'महरट्ट'पासून 'मराठी' पर्यंतच्या प्रवासात. मुख्य म्हणजे आजच्या 'मराठी' ह्या शब्दात शेवटचे व्यंजन महाप्राण आहे. तर 'महरट्ट' ह्या शब्दात शेवटचे व्यंजन अल्पप्राण आहे, या अल्पप्राणाचा महाप्राण करण्याकरिता क्रमाक्रमाने भाषाशास्त्रीय प्रक्रिया लागू कराव्या लागतील. आधी ह् + र् चा स्थलविपर्यय (metathesis) करून

र् + ह् हा क्रम साधावा लागेल. अशा प्रकारे 'महरट्ट'-पासून 'मरहट्ट' सिद्ध होईल. स्थलविपर्यय भाषाशास्त्रातील ऐतिहासिक परिवर्तनाच्या संदर्भात व एककालिक भाषाभ्यासाच्या संदर्भातही मान्यता पावलेली प्रक्रिया आहे हे इथे नमूद करावेसे वाटते. पुढे 'हट्ट' चे क्षतिपूरक दीर्घीकरणाच्या (compensatory lengthening) प्रक्रियेप्रमाणे 'हाट' होऊन 'मरहाट' हे रूप सिद्ध करून घ्यावयास हवे. पुढे आघात 'हा'वर सरकल्याने 'र' तील 'अ' चा लोप पावून 'मऱ्हाट' किंवा 'मऱ्हाटी' या शब्दांची सिद्धी संभवते. पुन्हा पुढे दुसऱ्यांदा कराव्या लागणाऱ्या स्थलविपर्ययाने 'म र् ह् आ ट् अ' पासून 'मराह् ट्अ असे रूप सिद्ध होईल. एकदा पुन्हा स्थलविपर्ययाची प्रक्रिया होऊन 'मराह् ट्अ'-पासून 'मराट्ह् अ' म्हणजेच 'मराठ' या मूळ पदाची सिद्धी होते. तेव्हा कुठे लिंगवाचक 'आ' किंवा 'ई' प्रत्यय लावून 'मराठा' किंवा 'मराठी' ह्या शब्दांची रूपसिद्धी होऊ शकेल. या व्युत्पत्तीच्या प्रक्रियाक्रमावरून 'माहाराष्ट्री' पासून 'मराठी' पर्यंतचा प्रवास तसा सरळ व सोपा नाही हे निश्चितपणे दिसून येते.

वरील व्युत्पत्तीच्या प्रयत्नामागे देशभाषांमधील प्रत्येक तत्त्वाचे मूळ संस्कृतमध्ये शोधण्याची बळवती प्रवृत्ती असल्याचे स्पष्ट होते. या प्रकृतीमुळे संस्कृत सोडून इतर प्रकारची व्युत्पत्ती एखाद्या विद्वानाने सुचविली तर ती सहसा पटत नाही व तिचा फार फार तर उल्लेख मात्र होतो. पण खऱ्या अर्थाने तिची दखल घेतली जात नाही. उदाहरणार्थ, डॉ. विल्सन या विद्वानाने आपल्या एका लेखात सुचविलेली व्युत्पत्ती पहा. हा लेख मोल्सवर्थ यांच्या मराठी-इंग्रजी शब्दकोशाच्या प्रास्ताविकाच्या भागात घालण्यात आला आहे. या व्युत्पत्तीचा उल्लेख कृ. पां. कुलकर्णी आपल्या मराठी भाषा उद्गम व विकास ह्या पुस्तकात करीतदेखील नाहीत. तरी वैद्य इत्यादी व प्र. न. जोशी यांच्या दोन पुस्तकांत या व इतर वेगळ्या मतांचा उल्लेख केलेला आहे. ह्या मतांची योग्य ती दखल घेणे आवश्यक आहे (मराठीचे भाषाशास्त्र; सुबोध भाषाशास्त्र).

डॉ. विल्सन यांनी ५ व्या शतकातील 'महावंसो' ह्या बौद्धपुराणात आढळणाऱ्या 'महरट्ट' ह्या शब्दाचा आधार घेतला आहे. त्यांच्या मते हे 'महाराष्ट्र' ह्या शब्दाचे पाली रूप आहे. याचीच व्युत्पत्ती त्यांनी 'महार + राष्ट्र' = महाराष्ट्र अशी केली आहे. या व्युत्पत्तीची 'जातिवाचक' म्हणून जोशी यांनी संभावना केली आहे. अशाच सारखी दुसरी व्युत्पत्ती 'महार + रट्ट' या दोन जमातींपासून निष्पन्न झालेले राष्ट्र म्हणजे महाराष्ट्र अशी आहे. अर्थात यालाही आधारभूत शब्द 'महरट्ट' हाच आहे. डॉ. ओपर्टच्या 'मल्लराष्ट्र' म्हणजेच म्हार > मार = मल्ल + राष्ट्र अशा व्युत्पत्तीतदेखील शेवटी म्हार > महार + राष्ट्र हा सामासिक शब्द म्हणजे पर्यायाने 'महरट्ट' हा शब्दच आधारभूत ठरलेला आहे. डॉ. भांडारकरदेखील 'रट्ट' हा राष्ट्रिकांचा संकेत मानून 'महारट्ट' हा शब्द व्युत्पादितात. म्हणजेच पर्यायाने 'महरट्ट' ह्या शब्दाचाच आधार घेताना दिसतात. अल्फ्रेड मास्टर हे 'महारठी' या गणवाचक शब्दाचा आधार घेऊन मराठीची व्युत्पत्ती करतात. त्यांना कुवलयमालाकथा या ग्रंथातील 'मरहट्ठे' या शब्दाची जाण असूनसुद्धा दोन शब्दांतील वर्णविपर्ययाने झालेल्या फरकाला त्यांच्या मते काही महत्त्व नाही असे दिसते.

वरील सर्व व्युत्पत्तींना अपवाद शं. बा. जोशी दिसतात ज्यांनी 'मरहट्ट' हे रूप आधारभूत मानून 'मर' (= झाड) हा कानडी शब्द व हट्ट-हट्टी (= मंडळ किंवा प्रदेश) हा शब्द मिळून 'मरहट्ट' म्हणजे झाडीमंडळ, दंडकारण्यातील झाडीमंडळ, अशा प्रकारे व्युत्पत्ती साधली आहे. पुढे 'मरहट्ट' याचेच पर्यायी संस्कृत रूप म्हणून महाराष्ट्र हे नाव प्रचलित झाले. त्यांच्या 'मऱ्हाटी संस्कृति' या पुस्तकाच्या नावातील 'मऱ्हाटी' ह्या शब्दाची व्युत्पत्ती 'महरट्ट'-पेक्षा 'मरहट्ट' पासून करणे त्यांना अधिक सोयीचे वाटले असल्यास नवल नाही. मुख्यत: 'महरट्ट' शब्दापासून व्युत्पत्ती करण्यात 'मराठी' ह्या शब्दातील अन्त्य 'ठ'-कार व्युत्पन्न करण्यासाठी 'ह'ला दोन अक्षरे पलीकडे, पहिल्यांदा 'र'च्या पलीकडे व पुन्हा दुसऱ्यांदा 'ट्ट'च्या पलीकडे, स्थलविपर्ययाच्या प्रक्रियेने सरकवावे लागेल. 'मरहट्ट'पासून व्युत्पत्ती केल्याने फक्त एकदाच स्थलविपर्यय करून अन्त्य 'ठ'कार सिद्ध होतो. भाषाशास्त्रीय दृष्टया 'मरहट्ट' पासून केलेली 'मराठी' ह्या शब्दाची व्युत्पत्ती अधिक सोपी व सरळ आहे यात संशय नाही.

वरील दोन परिच्छेदांतील विवेचनात 'महरट्ट' किंवा 'मरहट्ट' या देशज (vernacular) शब्दापासून मराठी शब्दाची व्युत्पत्ती पडताळून पाहण्यात प्रस्तुत






लेखकाची एक आधारभूत मान्यता व्यक्त होते. ती अशी की दोन किंवा अधिक भिन्न भाषा-भाषी समुदायांच्या आकस्मिक संपर्कातून उद्भवलेल्या परिस्थितीत जुजबी दळणवळण करणे शक्य व्हावे म्हणून मराठीचा जन्म झाला. तिचे प्राथमिक स्वरूप वाणिज्य-भाषेचे होते हे वर सांगितले आहेच. संपर्कात येणाऱ्या भाषांपैकी कोणतीही भाषा वाङ्मयात आढळणारी संस्कृत किंवा प्राकृत नव्हती. ती भाषा बोलली जाणारी कोणती तरी उत्तर-प्राकृत किंवा अपभ्रंश असावी. ह्या कारणास्तव संस्कृतेतर रूपापासूनच मराठीची व्युत्पत्ती केलेली अधिक श्रेयस्कर व सयुक्तिक होईल असे वाटते. पुरातन काळी लेखक व विद्वानांच्या संस्कृत-सुलभ कलांमुळेच या प्राकृत शब्दांचे संस्कृतीकरण 'महाराष्ट्र' असे केले गेले असावे. तसा 'महरट्ट' किंवा 'मरहट्ट' ह्या शब्दांचा 'महाराष्ट्र' ह्या शब्दाशी अर्थाअर्थी काही संबंध नसेलही. या प्रक्रियेचे अलीकडचे एक उदाहरण म्हणजे 'अलेक्झांडर' या शब्दाचे केलेले 'अलक्षेंद्र' असे संस्कृतीकरण होय. म्हणून 'मराठी' या शब्दाचे मूळ प्राकृत 'महरट्ट' किंवा 'मरहट्ट' या शब्दापासून शोधण्याचा प्रयत्न करावयास हवा, संस्कृत 'महाराष्ट्र'पासून नव्हे. असे केल्याने 'महाराष्ट्र'-पासून 'महरट्ट' पर्यंतचा भाषाशास्त्रीय प्रवास अनायासेच टळेल व मराठीच्या व्युत्पत्तीची प्रक्रिया तेवढीच सरळ व सुलभ होईल. 'महाराष्ट्र' ह्या शब्दाच्या वेगवेगळ्या भौगोलिक व्याप्ती असण्यावरूनही असे दिसते की कोणत्याही, विशेषतः दक्षिणेकडील, विस्तृत व सामान्यतः अपरिचित भूभागाचे 'महाराष्ट्र' असे नामधेय करण्यात येत असे. परंतु पुढे मात्र 'महरट्ट' किंवा 'मरहट्ट' ह्या लोकवाचक शब्दाचे संस्कृतीकरण झाल्यानंतर तशा प्रकारचे लोक ज्या भूभागात राहात असत त्या भूभागास ही संज्ञा 'संलग्न' करण्यात आली व अशा प्रकारे आज ज्या भूभागास 'महाराष्ट्र' असे म्हणतो त्याला हे नाव रूढ झाले. या विचारांच्या अनुषंगानेच 'मराठी' शब्दाची व्युत्पत्ती 'महरट्ट' किंवा 'मरहट्ट' पासून केलेली अधिक सयुक्तिक वाटते असे वर सुचविण्यात आले आहे.

'महरट्ट' किंवा 'मरहट्ट' ह्या शब्दांपैकी कोणता शब्द आधारभूत मानावा याचाही विचार करणे आवश्यक आहे. अनेक विद्वान या दोन शब्दांतील फरकाला 'मराठी'च्या व्युत्पत्तीप्रकरणी फारसे महत्त्व देताना दिसत नाहीत. उदाहरणार्थ हा उतारा पहा : "मराठी शब्द ज्या मरहट्ट किंवा महारट्ट शब्दावरून आला त्याचेही प्राचीन निर्देश पाहण्यासारखे आहेत." (प्र. न. जोशी, पान १०२). या दोन शब्दांचे उल्लेख अनेक ग्रंथांत आढळतात. महरट्ट शब्द पाचव्या शतकातील 'महावंसो' या बौद्ध पुराणात आढळतो. डॉ. विल्सन यांचे या शब्दाविषयीचे मत ध्यानात घेण्यासारखे आहे. त्यांच्या मते 'महरट्ट' हे 'महाराष्ट्र' ह्या संस्कृत शब्दाचे पाली रूप आहे. तशी पाली भाषा संस्कृत भाषेला सर्वच बाबतींत जवळची आहे. पुढे संस्कृतच्या प्रभावाखाली बौद्ध साहित्यनिर्मिती मिश्र किंवा भ्रष्ट संस्कृत (hybrid sanskrit) भाषेत झाली व जेव्हा महावंसो लिहिले गेले त्या वेळेस पाली भाषा संस्कृतच्या प्रभावछत्राखाली येऊन गेलेली होती. तेव्हा 'महरट्ट' हे बोलभाषेतील मूळ रूप नसून संस्कृतच्या 'महाराष्ट्र' या शब्दाचे पाली रूप असल्याबद्दल डॉ. विल्सन यांचे मत योग्य वाटते. म्हणून 'महरट्ट' शब्दावरून 'मराठी'ची व्युत्पत्ती करणे योग्य नव्हे. तशी केल्यास ज्या अडचणी वर 'महाराष्ट्री' संबंधी नमूद केल्या आहेत त्या सर्व इथेही लागू पडतील. हा एक दाखला सोडला, तर प्राकृत वाङ्मयात सर्वत्र 'मरहट्ट' असाच उल्लेख आढळतो. सर्वांत जुना उल्लेख उद्योतनसूरी ह्याने इसवी सन ७७८ मध्ये लिहिलेल्या 'कुवलयमालाकथा' या ग्रंथात आहे. त्यात अठरा देशी भाषांच्या यादीत 'मरहट्ठ' या भाषेचाही उल्लेख आहे. याच ग्रंथात पुढे मराठा माणसाचे वर्णन करताना लोकनिर्देशक 'मरहट्टे' असा उल्लेख आहे. कोउहल नावाच्या कवीने इ. स. ८०० च्या सुमारास रचलेल्या 'लीलावई' ह्या खंडकाव्यात 'मरहट्ट देसिभासा' असा उल्लेख आलेला आहे. त्याचप्रमाणे इ. स. ८५९ मध्ये लिहिलेल्या धर्मोपदेशमाला क्र. २८ धनकथा या ग्रंथात 'मरहट्ठ' भाषेचे सुन्दर कामिनीची उपमा देऊन वर्णन केले आहे. इ. स. ९०० च्या सुमारास राजशेखराने लिहिलेल्या बालरामायण नाटकात सीतेच्या संभाषणात 'मरहट्ट' शब्द येतो. विशेष म्हणजे राजशेखराचे हे नाटक संस्कृत भाषेत आहे. परंपरेप्रमाणे स्त्री-पात्रे प्राकृत बोलतात, त्याप्रमाणे सीता 'मरहट्ट' हा शब्द वापरते. यात संस्कृतची छाया म्हणून राजशेखराने 'महरट्ट' शब्द न वापरता 'मरहट्ट' च वापरला आहे यावरूनही 'मरहट्ट' हाच खरा मूळ शब्द असावा, असे म्हणता येईल व 'मरहट्ट' शब्दा-






पासूनच मराठीची व्युत्पत्ती करावयास हवी. 'मरहट्ट' शब्द हाच खरा मानून यातून उर्दूप्रमाणे वाणिज्य भाषेचा अर्थ निघू शकतो काय हे आता पाहू या.

'मरहट्ट' हा दोन पदांनी सिद्ध झालेला शब्द आहे. ती दोन पदे क्रमशः 'मर' व 'हट्ट' ही होत. यांपैकी दुसरे पद आधी घेऊ या.

'हट्ट' फार पुरातन काळापासून 'बाजार' ह्या अर्थाने भारतात वापरला जात आहे. या शब्दापासूनच 'हाट' हा शब्द अर्वाचीन भाषांमध्ये विकसित होऊन आला आहे. हट्ट > हाट हा बदल क्षतिपूरक दीर्घीकरणाच्या प्रक्रियेने संपन्न झाला, हेही इथे नमूद करावयास हवे. 'हाट' ह्या शब्दाची व्याप्ती भारतात सर्वत्र आहे हेही ध्यानात घेण्यासारखे आहे. हा शब्द काश्मिरी (अठ, हाट), कुमाउनी (हाट), असमिया, बंगाली, ओरिया, बिहारी (हाट्) ह्या भाषांमध्ये आढळतो. (कृ. पां. कुलकर्णी, मराठी व्युत्पत्ती कोश, पान ७७०). हिन्दीच्या अनेक बोलींमध्येदेखील 'हाट' शब्द आढळतो. बोलचाली हिन्दीत 'बजार–हाट' व मराठीत 'बाजार–हाट' अशा जोड शब्दात तो आढळतो. मराठीत 'हाट' हा शब्द एकटा कधीच वापरीत नाहीत. 'बाजार' शब्द मुस्लिमांच्या आक्रमणानंतर महाराष्ट्रात आला. तेव्हा 'हाट' च्या जोडशब्दात आढळल्याने असे दिसते की त्या आधी 'हाट' हाच शब्द सर्वत्र वापरात होता. 'बाजार' शब्दाचे चलन वाढत गेल्याने 'हाट' शब्द मागे पडला व तो 'बाजार –हाट' ह्या जोडशब्दातच उरून राहिला. मधल्या काळात जेव्हा 'बाजार' शब्द विशेष परिचयाचा नव्हता, तेव्हा त्याबरोबर परिचयाचा 'हाट' शब्द वापरण्याची प्रथा रूढ झाली असावी. हाच प्रकार हिन्दीभाषी प्रदेशांमध्येही घडला असावा व म्हणून बोलीभाषेत 'बाजार–हाट' हा जोडशब्द आजही प्रामुख्याने आढळतो.

प्राकृत भाषांमध्ये 'हट्ट' किंवा 'अट्ट' असे रूप 'हाट' चे आढळते. ते अर्वाचीन भाषांमध्ये 'हाट' झाले आहे हे वर म्हटलेच आहे. संस्कृतमध्ये ह्या शब्दाचे 'हट्ट' किंवा 'हट्टी' अशी दोन रूपे आढळतात. ह्यांपैकी 'हट्ट' हेच सर्वत्र वापरात होते, हे ह्या शब्दाच्या सर्व प्रदेशात असणाऱ्या व्याप्तीवरून स्पष्ट होते. तरी 'हट्टी' हा शब्द आजही असमिया नावात आढळतो. आसममध्ये दोन शहरांची नावे क्रमशः 'जोरहाट' व 'गुवाहाटी' अशी आहेत. 'गुवाहाटी' शब्दाचा अर्थ 'सुपारीचा बाजार/पेठ' असा होतो.

भारतीय आर्यभाषांमध्ये 'हट्ट' हा शब्द द्राविडी भाषांमधून आला आहे हेही मान्य करण्यास हरकत नसावी. द्राविडी भाषांमध्ये 'हट्ट' किंवा 'हट्टी' शब्दाचा अर्थ 'वसाहत' किंवा 'बाजार' असा होतो. द्राविडी भाषांमधून हा शब्द भारतीय आर्यभाषांमध्ये ऋग्वेदाच्या काळापासून आला असावा हे ऋग्वेदातील 'हाटवट' ह्या शब्दाच्या अस्तित्वावरून सिद्ध होते (कृ. पां. कुलकर्णी, म. व्यु. को., पान ७७०).

आर्यांनी हा शब्द द्राविडी भाषांमधून घेतला यावरून वाणिज्यप्रक्रियेत आर्यांच्या आक्रमणाच्या प्रारंभिक काळात द्राविडीभाषिकांचा प्रामुख्याने सहभाग असावा किंबहुना तेच बाजार भरवीत असावेत व आक्रमक आर्य त्यात सहभागी होत असावेत. म्हणूनच हट्ट > हाट शब्दाला प्राधान्य आले व त्याची व्याप्ती सर्वत्र झाली. मोल्सवर्थच्या मराठी शब्दकोशात (पान ९३) 'हाट' ह्या शब्दाचा अर्थ 'विशेषतः फिरता बाजार किंवा जत्रा' (esp. a movable market or fair) असा दिला आहे. आर्यांच्या आक्रमणाच्या काळीही आर्यांची जशी जशी आगेकूच होत होती त्याबरोबरच 'हट्ट' > 'हाट' ही त्या त्या स्थळी सरकत जात असेल. पुढे आर्य निम-स्थायी किंवा स्थायी झाल्यानंतर आठवड्याच्या विशिष्ट दिवशी हा 'हट्ट > हाट' एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी फिरत असावा. हे दृश्य आजही खेडोपाडी सर्वत्र दिसते. तेव्हा 'मरहट्ट' मधील दुसरे पद 'बाजार'–वाचक आहे असे म्हणणे सयुक्तिक होईल असे वाटते.

'हाट' शब्दाच्या धर्तीवर 'बाजार' हा शब्द मराठीत कसा आला याचेही विवेचन या अनुषंगाने आवश्यक वाटते. 'बाजार' हा शब्द मुस्लिम आक्रमकांबरोबर भारतात आला. मुस्लिम सत्ता भारतात प्रस्थापित झाल्यानंतर त्यांच्या सैन्याच्या शैलीत फरक पडत गेला. पूर्वी जिथे सडे सैन्य घेऊन स्वारी निघत असे, तेथेच नंतर जनानखाना, मोठा लवाजमा व बाजार बरोबर घेऊन स्वारी निघू लागली. हीच प्रथा पुढे मराठ्यांनीही आत्मसात केली. म्हणूनच त्यांच्याबरोबर 'बाजार-बुणगे' असल्याचा उल्लेख आढळतो. 'बाजार' शब्द मराठीभाषिकांना आत्मसात करण्याची गरज

भासावी ह्याचे कारण मुस्लिमांचे वर्चस्व व त्यांच्या 'बाजारा'चे काही वैशिष्टच असावे. अशा 'बाजारा'त अशा विशिष्ट किंवा मौल्यवान वस्तू मिळत असाव्यात ज्या साधारणतः त्यांच्या **नियतकालिक** 'हाटा'त मिळत नसाव्यात. ह्या विशिष्ट वस्तू परकीय देशांच्या व भारतातील अन्य भागांच्या असाव्यात. मराठी प्रदेशात मुस्लिमांची सत्ता प्रस्थापित झाल्यानंतर हा 'बाजार' स्थायी स्वरूपाचा झाला असावा व या शब्दाची व तदनुषंगी जागेची सामाजिक प्रतिष्ठा 'हाटा' पेक्षा केव्हाही अधिक असावी. हळूहळू 'हाटा'त ज्या वस्तू विकण्यात येत असत त्याही 'बाजारा'त समाविष्ट झाल्या असाव्यात व म्हणून 'हाट' हा शब्द 'बाजार-हाट' या जोड शब्दापुरताच मर्यादित झाला असावा. वरील विवेचनाचे तात्पर्य असे, की भारतीय आर्य भाषेत द्राविड भाषेतील 'हट्ट > हाट' शब्द येण्याचे कारण जसे जेत्या आर्यांची स्वारीवर सडे सैन्यानिशी जाण्याची प्रथा व सैन्याच्या आगेकूचीबरोबर होणाऱ्या वाणिज्य प्रक्रियेत जित द्राविडभाषिकांचे प्राधान्य अशा दोन गोष्टींत सापडते, त्याचप्रमाणे 'बाजार', शब्द मराठीत येण्याचे कारण जेत्या मुस्लिमांच्या विविध वस्तुसंपन्न 'बाजारा'सकट सैन्याची हालचाल करण्याच्या शैलीत सापडते. म्हणून 'हाट' शब्द जेथे जेत्यांनी जितांकडून घेतलेला तेथे 'बाजार' हा शब्द जितांनी जेत्यांकडून घेतलेला आढळतो.

वरील विवेचनावरून 'हाट' हाच शब्द मूळ मराठी शब्द आहे व म्हणून तोच 'मरहट्ट' मधील 'हट्ट' चे परवर्ती रूप असावे असा तर्क करणे योग्य आहे.

आता 'मरहट्ट' मधील पहिले पद 'मर' ह्या शब्दाविषयी चर्चा करू या. ह्या शब्दाबद्दल बरीच चर्चा वर झालेली आहे, ती थोडक्यात अशी : 'मर' हा शब्द एक तर जातिवाचक असावा किंवा वस्तुवाचक. पहिल्या कोटीत 'महार', 'मल्ल' इत्यादी अर्थ बसतात तर दुसऱ्या कोटीत 'झाड' हा अर्थ बसतो. यांपैकी महाराष्ट्राच्या विशिष्ट परिस्थितीत 'महार' आणि 'झाड' हे दोन अर्थ विशेषेकरून लक्ष पुरविण्याजोगे वाटतात.

'मराठी' या शब्दात महार हा शब्द आहे हे मत डॉ. विल्सन यांनी 'मराठी'ची व्युत्पत्ती 'महार+राष्ट्र' ते 'महाराष्ट्र' अशा प्रकारे करताना मांडले आहे. 'मराठी' शब्दाची व्युत्पत्ती 'महाराष्ट्र' किंवा तद्भव शब्दापासून करणे प्रस्तुत लेखकाला मान्य नाही. 'महाराष्ट्र' या शब्दाशी कोणताही संबंध नसलेला 'मरहट्ट' हा शब्दच 'मराठी' या शब्दाच्या व्युत्पत्तीसाठी मूलभूत आधार धरण्यात यावा असे मत प्रस्तुत लेखकाने वर प्रदर्शित केले आहे.

या संदर्भात प्रश्न असा विचारावयास हवा, की 'मर' शब्द 'महार' शब्दापासून व्युत्पन्न झाला असावा काय ? या बाबतीत विशेष लक्ष देण्यासारखा मुद्दा हा आहे, की 'महार' हा शब्द मराठीभाषी प्रदेशात सर्वत्र व त्यापुरताच व्याप्त आहे. 'गाव तेथे महारवाडा' या म्हणीचा लाक्षणिक अर्थ काहीही असो पण सामाजिक अर्थ मर < महार ह्या व्युत्पत्तीला पुष्टिकारक आहे. मराठी प्रदेशात आजही महार लोक सर्वत्र वास्तव्य करून असलेले आढळतात पण गावाच्या बाहेर एका विवक्षित भागातच. याचा अर्थ समजून घेणे आवश्यक आहे. आर्यांच्या आक्रमणाच्या वेळी हल्ली महाराष्ट्र या नावाने ओळखल्या जाणाऱ्या प्रदेशात प्राधान्याने त्यांचीच वसती होती, ते आजच्यासारखे गावापासून दूर एका कोपऱ्यात राहात नसत, असे गृहीत धरणे योग्य होईल. आक्रमक आर्यांनी त्यांचा भूभाग बळकावला व हळूहळू त्यांची उपजीविकेची साधने हिसकावून घेतली. जी निकृष्ट व त्याज्य कामे जेथे आर्य करीत नसत ती कामे ते महारांकरवी करवून घेत असत. जे महार पूर्वी स्वावलंबी होते ते आता आर्यांवर अवलंबून राहू लागले, परावलंबी झाले. त्यांची कामे खालच्या दर्जाची समजली गेल्यामुळे त्यांना गावापासून दूर लोटण्यात आले. स्पृश्य-अस्पृश्य भेद समाजात रूढ झाला. अशा प्रकारे पूर्वीच्या काळी महारांचे प्राधान्य लक्षात घेतले, तर आर्यांच्या वसाहतीच्या प्रारंभी आर्य सैनिकांना लागणाऱ्या वस्तू जर महारांनी भरलेल्या बाजारात किंवा 'हट्टा'त मिळत असल्या तर आश्चर्य वाटावयास नको. अशा 'महारहट्ट'-मध्ये देवाण-घेवाणीकरिता विकसित झालेली आर्यांची बोली हीच मराठीची जननी होय, असे समजण्यास हरकत नसावी.

भाषावैज्ञानिक दृष्टिकोणातून 'महारहट्ट' पासून 'मरहट्ट' हे रूप कसे सिद्ध झाले हेही पाहू या. अर्वाचीन मराठी भाषेमध्ये शब्दरचनेचा असा नियम आहे, की एका शब्दात दोन महाप्राण वर्ण राहू शकत नाहीत. उदाहरणार्थ, मराठीचा 'हात' हा शब्द पहावा. हा शब्द प्राचीन आर्यभाषेतील 'हस्त' या शब्दापासून उत्पन्न झाला आहे.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



या शब्दाचा 'हत्थ' व पुढे 'हाथ' असा विकार हिंदी व काही इतर भाषांमध्ये झाला, परंतु मराठीतील वरील प्रतिबंधामुळे थ् मधील महाप्राणअंशाचा लोप करण्यात आला व मराठीतील 'हात' हा शब्द निष्पन्न झाला. इथे असा प्रश्न विचारला जाऊ शकतो की 'हाथ'-मधील दोन महाप्राणांपैकी दुसऱ्या महाप्राणअंशाचाच लोप का झाला, पहिल्या महाप्राणअंशाचा का झाला नाही; म्हणजे 'आथ' असा शब्द निष्पन्न झाला असता. या प्रश्नाचे उत्तर स्वराघाताच्या पद्धतीला अनुसरून देता येईल. साधारणत: द्वित्व वर्णाच्या आधी येणाऱ्या स्वरावर आघात येत असतो. त्यानुसार 'हत्थ'-मध्ये आघात 'ह' वर येईल. आघात असलेले अक्षर लोप व त्यासारख्या ध्वनिपरिवर्तनापासून सुरक्षित असते, म्हणून बदल दुसऱ्या अक्षरातील महाप्राणामध्ये झाला. 'हत्थ' पासून 'हत्त' हा शब्द निष्पन्न झाला. पुढे क्षतिपूरक दीर्घीकरणाच्या प्रक्रियेमुळे 'हत्त' चे 'हात' असे रूप निष्पन्न होते. या महाप्राण लोपाच्या नियमामुळे 'महारहट्ट' मधील पहिल्या महाप्राण 'ह' चा लोप झाला असावा. या ठिकाणी पुन्हा पहिल्या महाप्राणाऐवजी दुसऱ्या महाप्राणाचा म्हणजे 'हट्ट' मधील 'ह' चा लोप का झाला नाही अशी शंका उपस्थित केली जाऊ शकते व ती रास्तही आहे. या शंकेचे समाधान करणे कठीण नाही. 'महार + हट्ट' हा समास विशेषण + विशेष्य अशी अंतर्गत संरचना असलेला आहे. या समासाच्या दोन्ही पदांमध्ये विशेष्य हे प्रधान असते व त्यामुळेच त्यावर प्रधान स्वराघाताचे आधान होत असते. या प्राधान्यामुळे व तदानुषंगीक स्वराघातामुळे ते पद लोपासारख्या बदलापासून सुरक्षित असते. याउलट, विशेषण हे पद गौण असते व म्हणूनच त्यावरील स्वराघातही गौण व दुर्बल असतो. 'ह'-वरील आघात पुढे द्वित्व वर्ण असल्याने आणखी सबल होतो. अशा प्रकारे महाप्राणलोपाचा नियम प्रथम पदातील महाप्राण वर्णाला लागू होतो व 'मार + हट्ट' हे रूप निष्पन्न होते. कालान्तराने 'हट्ट' वरील आघाताने 'मार' मधील 'आ' स्वर दुर्बल होऊन 'मर' हा शब्दांश निष्पन्न होतो. पुढे 'र' चा 'अ'ही 'हट्ट'-मधील 'ह' वरील आघातामुळे लोप पावून 'मऱ्हट्ट' हा शब्द निष्पन्न होतो. याच शब्दापासून पुढे क्षतिपूरक दीर्घीकरणामुळे 'मऱ्हाट' शब्द सिद्ध होतो. याच्याही पुढे 'ह' चा स्थलविपर्यय होऊन 'मराह' असे रूप सिद्ध होते. अशा प्रकारे भाषावैज्ञानिक दृष्टचादेखील 'महारहट्ट' पासून 'मरहट्ट' व पुढे 'मराठ' हे रूप मराठीच्या विकासात अस्तित्वात असलेल्या नियमाप्रमाणे सहज सिद्ध होऊ शकते.

'मरहट्ट' मधील 'मर' ह्या शब्दाविषयी थोडी चर्चा आधी करण्यात आलेली आहे. 'मर' ह्या शब्दाचा पर्यायी अर्थ 'झाड' असा होतो. 'झाड'चा विस्तारित अर्थ 'झाडी' किंवा 'जंगल' असा होऊ शकतो. 'मर' हा शब्द संस्कृतमधील 'मर्कट' व मराठीतील तद्‌भव शब्द 'माकड' ह्यातही समाविष्ट आहे. मर = झाड व कट = उडी मारणे असा 'मर्कट' शब्दाचा मूळ अर्थ आहे. 'मर' हा द्राविडी भाषेतील शब्द आहे हेही निर्विवाद आहे. 'मर' या शब्दाचा विस्तारित अर्थ घेऊन 'मरहट्ट' ह्या शब्दाचा 'झाडी किंवा जंगलातील बाजार/पेठ' असा अर्थ निष्पन्न होऊ शकतो. आक्रमक आर्यांच्या भीतीने या भागातील द्रविडभाषाभाषी लोक किंवा रहिवासी झाडीत किंवा जंगलात बाजार भरवीत असत म्हणून आर्यांनी द्राविडी भाषेतील पूर्ण समासच आपल्या भाषेत आत्मसात केला असे म्हणणेही सयुक्तिक होईल.

'मरहट्ट' ह्या शब्दाचे मूळ 'महारहट्ट' किंवा 'मरहट्ट' ह्या दोहोंपैकी कोणत्याही समासात असू शकते. दोन्ही पर्यायांमध्ये मराठी ही वाणिज्यभाषा म्हणून उगम पावली हे सूत्र समान होय. या पर्यायांपैकी कोणता पर्याय अधिक सरस आहे हे पडताळून पाहावयास हवे.

मराठी भाषेत आलेले द्राविडी शब्द, विशेषत: नातेसंबंध–दर्शक शब्द, हे सिद्ध करतात, की आक्रमक आर्य व आक्रान्त द्राविडीभाषाभाषी लोक यांच्यात कालान्तराने रोटी-बेटी व्यवहार सुरू झाला व यांचा पुढे एकजिनसी समाज मराठी प्रदेशात विकसित झाला व म्हणूनच आर्यभाषाभाषिकांचे व द्रविडभाषाभाषिकांचे नातेसंबंधवाचक शब्द यांची सरमिसळ झाली. उदा., मराठीतील अप्पा, अण्णा, आत्या, काकी इत्यादी शब्द द्राविडी आहेत. हे आर्य व द्रविड या दोन भाषाभाषी समाजांच्या एकजिनसीकरणाचे द्योतक आहे. तसे एकजिनसीकरण महाराष्ट्राच्या समाजात महारांच्या बाबतीत आजही झालेले दिसत नाही. ते आजही मराठी समाजाचे घटक असले तरी

वेगळे आहेत. महारवाडा हा नेहमीच गावाचा भाग असूनही गावापासून कुठेतरी दूर व वेगळा राहात आलेला आहे. अजूनही महारांत व इतर घटकांत मराठी समाजात रोटी-बेटी व्यवहार अपवादानेच होताना आढळतो. त्यामुळे समाजात एकजिनसीपणा येणे शक्यही नाही. म्हणून 'महारहट्ट' पेक्षा 'मरहट्ट' हा पर्याय अधिक सरस वाटल्यास नवल नाही. झाडी किंवा जंगलातील बाजाराच्या निमित्ताने संपर्कात आलेले दोन भाषिक समाज पुढे मराठीला बीजरूप असणाऱ्या वाणिज्यभाषेच्या विकासाला कारणीभूत होऊन नित्याच्या जीवनाच्या आवश्यकतेपायी अधिकाधिक जवळ येत गेले व पुढे रोटी-बेटी संबंध होऊन हा मर्यादित संपर्क जीवनाच्या संपूर्ण कक्षेस व्याप्त करता झाला व एकजिनसी भाषिक समाज विकसित झाला. या सर्व प्रक्रियेत आर्य भाषाभाषिकांचा सहभाग अधिक सबळ होता हे वाणिज्य-भाषेला आधारभूत भाषा आर्य-भाषाच होती यावरून व आर्यभाषिकांचे द्राविडीकरण होण्यापेक्षा द्राविडांचे आर्यीकरणच अधिक झाले यावरूनही सिद्ध होते. मराठी ही आर्यभाषा आहे व होती आणि शिवाय मराठी संस्कृती ही मूलतः आर्य संस्कृतीच आहे या बाबतीतही वाद नाही. अशा प्रकारे आर्यभाषिकांचे प्राधान्य व द्राविडभाषिकांचा दूरगामी प्रभाव अशा प्रक्रियेतून मराठी भाषा व संस्कृती यांचा उगम व विकास झाला. निष्कर्षतः असे म्हणता येईल की 'महारहट्ट' पेक्षा 'मरहट्ट' या समासापासून 'मराठी'ची व्युत्पत्ती करणे अधिक सयुक्तिक वाटते. या निष्कर्षाने 'महारहट्ट' पासून 'मरहट्ट' पर्यंतचा भाषावैज्ञानिक व्युत्पत्ति-प्रवास अनायासेच टळतो व 'मराठी'ची व्युत्पत्ती सरळसरळ 'मरहट्ट' पासून करता येते. अशा प्रकारे व्युत्पत्ती-प्रक्रिया सहजगत्या सोपी होऊन जाते. म्हणूनही 'मरहट्ट' पासून 'मराठी'ची व्युत्पत्ती करणे अधिक श्रेयस्कर आहे.

मराठी भाषा ही वाणिज्यभाषा म्हणून उगम पावली हे मत शाब्दिक व्युत्पत्तीला अनुसरून बरोबर वाटत असले, तरी भाषेमध्ये काही पुरावा मिळतो काय हेही पाहणे योग्य आहे.

या संदर्भात बाजारातील देवाण-घेवाणविषयक शब्द मराठीला बीजरूप असलेल्या वाणिज्य-भाषेच्या काळाची आठवण म्हणून आजही उरून आहेत काय हे पाहणे योग्य ठरेल. या संदर्भात द्राविड-उद्‌भवाचे मापवाचक 'कुडव' व 'मुद'; वस्तुवाचक 'पडोळ, फणस, फोल, बंडी'; व्यवसायवाचक 'खाटिक' असे शब्द अस्तित्वात आहेत जे 'मरहट्ट' काळाची आठवण म्हणून संबोधिले जाऊ शकतात. याशिवाय अशी अनेक द्राविडी रूपे असतील की, जी लोप पावली असतील व ज्यांचा आजच्या मराठी भाषेत मागमूसही उरला नसेल.

वाणिज्यभाषेचे एक सर्वसामान्य, सर्वमान्य व सार्वत्रिक वैशिष्ट्य असे आहे, की प्रमाणभाषेतील बहुविध भेद उदा., लिंग, वचन, पुरुष, काल इत्यादी वाणिज्यभाषेत समतल ( levelling ) केलेले किंवा झालेले असतात. म्हणून हे भेद त्या प्रमाणात सापडत नाहीत. भारतातील वाणिज्यभाषेचे जिवंत उदाहरण म्हणजे मुंबईत बोलले जाणारे हिन्दी होय. प्रमाणभाषेत जिथे भविष्यकाळात प्रथम पुरुष एकवचन जाऊंगा जाऊंगी, मध्यम व अन्य पुरुष एकवचन–जाएगा जाएगी, मध्यम पुरुष 'तुम' बरोबर जाओगे, जाओगी व सर्व पुरुष बहुवचन जाएंगे, जाएंगी असे रूप-वैविध्य पुरुष-वचन-लिंग यांच्या आधारावर आढळते तिथेच मुंबईच्या हिन्दीत या सर्व रूपांच्या ऐवजी एकच रूप 'जाएगा' हे आढळते. हे समतलीकरणाचे (levelling) एक आत्यंतिक उदाहरण होय. अशी काही प्रक्रिया मराठी भाषेच्या विकसनकाळात घडली आहे काय हे पहावे लागेल. या प्रश्नाच्या उत्तराच्या संदर्भात प्रमाणभाषेकडून मदतीची अपेक्षा करणे व्यर्थ आहे कारण तिच्यावर संस्कृत भाषेचे संस्कार अनेक शतके झाल्याने जे भेद लुप्त झाले असतील ते पुन्हा मराठीत प्रस्थापित झाले असतील. यासाठी बोलीभाषांकडे लक्ष दिल्यानेच काही पुरावा हाती लागतो काय ते पहावे लागेल. या दृष्टिकोणातून नागपूर–वऱ्हाडकडील बोली उपयोगी पडेल असे वाटते. नागपूर–वऱ्हाडकडील बोलीकडे यादृष्टीने पाहण्यात जितके औचित्य साधले जाईल तितके मराठीच्या दुसऱ्या बोलीकडे पाहण्यात साधले जाणार नाही. याचे कारण मराठीला बीजरूप असलेली वाणिज्यभाषा विदर्भाच्या भूमीतच विकसित झाली असावी असे प्रस्तुत लेखकाचे मत आहे. या मताच्या मुळाशी महाराष्ट्राच्या वसाहतीकरणाला पुरातन काळी विदर्भापासूनच सुरुवात झाली असावी, हे मत होय ( पहा : खोकले, विदर्भ : अस्मितेच्या शोधात ). ही बीजरूप असलेली भाषा वाणिज्यभाषाच होती याचा आणखी व सबळ पुरावा 'वऱ्हाड' या

शब्दाच्या अनेक व्युत्पत्तींपैकी एका व्युत्पत्तीत म्हणजे 'वर + हाट' = थोर / संपन्न बाजार / पेठ* याच्यात आहे. प्रस्तुत लेखकाच्या मते मुळात हा शब्द 'मर + हट्ट' असावा कारण आर्यांच्या आगमनापूर्वी द्राविडभाषाभाषिकांची व्याप्ती उत्तरेकडे विंध्य-पर्वतापर्यंत होती हे मत सर्वश्रुत आहे व भाषिक पुराव्यांवरून पटण्यासारखे आहे. पुढे जेव्हा विदर्भाची भूमी आर्यांच्या वसाहतीनंतर संपन्न झाली व संस्कृतच्या प्रभावछत्राखाली आली तेव्हा 'मर'चे संस्कृतीकरण 'वर' असे झाले असावे व वऱ्हाड, वऱ्हाडी हे शब्द विकसित झाले असावेत. परंतु याआधीच ही भाषा वऱ्हाडापासून दक्षिण-पश्चिम दिशेकडील प्रदेशांत आर्यांच्या वसाहतीकरणाच्या प्रसाराबरोबर पोचली व पसरली असावी व त्याबरोबर तिला संबोधणारा 'मरहट्ट' हा शब्दही नवीन भागात चलनात आला असावा. पुढे त्यापासूनच, 'मराठी' हा शब्द जन्मला हे वर विवेचनात आलेच आहे. थोडक्यात 'वऱ्हाडी' आणि 'मराठी' यांचा व्युत्पत्तिकारक शब्द एकच आहे असे म्हणावे लागेल. फरक एवढाच, की विदर्भ किंवा वऱ्हाड हा प्रदेश संस्कृत वाङ्मयाचे केंद्र अनेक शतके राहिल्याने 'मर'चे 'वर' झाले. दक्षिण-पश्चिम महाराष्ट्रात संस्कृतऐवजी लोकभाषेचे (vernacular) प्राबल्य राहिल्याने 'मर' जसेच्या तसेच राहिले व पुढे 'मराठी'च्या जन्मास कारणीभूत ठरले.

विदर्भाच्या भूमीत विकसन पावलेल्या व मराठीला बीजरूप असलेल्या या भाषेचे स्वरूप खरोखरीच वाणिज्यभाषेचे होते काय हेही परीक्षून पाहणे आवश्यक आहे. नागपूर-वऱ्हाडकडील बोलीत प्रमाणभाषेसारखी तीन लिंगे– पुंल्लिग, स्त्रीलिंग व नपुंसकलिंग आढळत नाहीत. फक्त पुंल्लिग व स्त्रीलिंग ही दोनच लिंगे आढळतात. शिवाय पुरुष-लिंग-वचन यांच्या आधारावर क्रियापदांचे जे भेद प्रमाणभाषेत आहेत, त्यामानाने या बोलीभाषेत भेद बरेच कमी आहेत. प्रमाणभाषेत प्रथम पुरुष एकवचन– जातो, जाते, बहुवचन– जातो, मध्यम पुरुष एकवचन– जातो, जाते, बहुवचन– जाता, अन्य पुरुष एकवचन– जातो, जाते, बहुवचन– जातात अशी रूपे लिंगभेदानुसार होतात. म्हणजे तीन पुरुष, दोन वचन व तीन लिंग अशा एकूण (३×२×३=१८) अठरा भेदांसाठी जातो, जाते, जाता, जातात अशी फक्त चार रूपेच प्रमाणभाषेत आहेत. जरी कोणत्याही भाषेत प्रत्येक भेदाप्रमाणे एकास एक (one to one matching) अशी रूपे दिसत नाहीत किंवा अपेक्षितही नाहीत तरी या ठिकाणी रूपांची झालेली बचत पाहता, प्रमाणभाषेतसुद्धा वाणिज्य-भाषेत दिसतो तसा समतलीकरणाचा परिणाम दिसून येतो असे म्हणावयास हरकत नाही. याच्या तुलनेत नागपूर–वऱ्हाडकडील बोलीत काय दृश्य दिसते ते पाहू या. या बोलीत प्रथम पुरुष जातो (दोन्ही वचनांकरिता व लिंगांकरिता), मध्यम पुरुष एकवचन–जाते, बहुवचन जाता (दोन्ही लिंगांकरिता), अन्य पुरुष एकवचन–जाते, बहुवचन–जातात (दोन्ही लिंगांकरिता) अशी रूपे आहेत. इथे वचन व लिंग दोन्ही प्रकारचे भेद कमी झालेले आहेत, अर्थात, एकूण (३×२×२=१२) बाराच भेद आहेत व चारच रूपे आहेत. असे अनुमान करता येते की वाणिज्य-भाषेच्या स्वरूपात असताना त्या काळच्या मराठीत यापेक्षाही कमी भेद असावेत. वाणिज्यभाषा ज्या प्रमाणात नवीन विकसनशील समाजाच्या अधिकाधिक विस्तृत अंगाची भाषा होत गेली त्या प्रमाणात हे भेद पुनः प्रस्थापित होत गेले असावेत. पुढे तीच समाजाची मातृभाषा झाल्यानंतर जीवनातील सर्वांगातील अनुभवाच्या अभिव्यक्तीचे सक्षम माध्यम म्हणूनही तिच्यात अनेक नवनवीन भेद येत गेले असावेत. आजच्या मराठी भाषेत साहित्य, संस्कृती, विज्ञान व तंत्रज्ञान यांचे सक्षम माध्यम म्हणून पूर्वीपेक्षाही अधिक भेद उत्पन्न झाले असावेत. असा विकास वाणिज्यभाषेच्या उत्तरकाळात अनेक जागी झालेला आढळतो.

वरील विवेचनावरून मराठीचा विकास वाणिज्य-भाषेच्या बीजरूपापासून व विशेषत्वेकरून समाज-व्यवहाराच्या एका विवक्षित प्रक्रियेतून झाला आहे असे मानावयास बराच वाव आहे.

३) **नातेसंबंध** : वर थोड्या वेगळ्या संदर्भात मराठीतील नातेसंबंधवाचक शब्दांची चर्चा आलेली

* ही व्युत्पत्ती डॉ. मधुकर आष्टीकर यांनी त्यांच्या 'वऱ्हाडी भाषेची चळवळ–एक आलेख' हे शीर्षक असलेल्या शोधनिबंधात दिली. हा निबंध मुंबई विद्यापीठाच्या भाषाविज्ञान विभागातर्फे मराठीचा विकास : भाषावार प्रांतरचनेनंतरची वास्तवस्थिती या विषयावर मार्च १६ व १७, १९९० या दोन दिवशी आयोजित केलेल्या राष्ट्रीय परिषदेत वाचण्यात आला.





अनुक्रमणिका

आहे. इथे अशाच शब्दांचा मराठीच्या विकासात समाज व्यवहाराचा संबंध कसा आला या संदर्भात विचार करावयाचा आहे.

मराठी भाषेत आलेले द्राविडी नातेसंबंधवाचक शब्द द्रविड आणि आर्यांचा मिळून एक एकजिनसी समाज निर्माण झाल्याचे निदर्शक आहेत असे वर प्रतिपादन केले आहे. असे अनेक शब्द अजूनही मराठी भाषेत टिकून आहेत. काही निवडक शब्दांची चर्चा या ठिकाणी अभिप्रेत आहे.

'अम्बा, अक्का, अल्ला' हे मातृवाचक शब्द संस्कृतात आहेत आणि संस्कृत व्याकरणातदेखील त्यांची नोंद आहे. परंतु त्यांच्यापैकी 'अक्का' ह्या शब्दाचा मोठ्या बहिणीला संबोधित करणारा प्रयोग खास मराठी आहे कारण हा कोणत्याही इतर आर्यभाषांमध्ये तो सापडत नाही. द्राविडी भाषांमध्ये मात्र हा प्रयोग सर्वसाधारणपणे आढळतो. तसेच मोठ्या भावाकरिता 'अण्णा', वडिलांकरिता 'अप्पा', वडिलांच्या बहिणीकरिता 'अत्ते, अत्ती, आत्या', चुलतीकरिता 'काकी' हे सर्व प्रयोग द्राविडी आहेत. हे सर्व शब्द समाजरचनेमधील प्राथमिक घटक कुटुंब यासंबंधी आहेत हे अतिशय महत्त्वाचे आहे. यावरून आर्य व द्राविडी समाज किती एकरूप होऊन मराठी समाजाची निर्मिती झाली हे निदर्शनास येते.

या संदर्भात 'वहिनी' शब्द आणखी बोलका आहे. मराठीत मोठ्या भावाच्या पत्नीसाठी वापरला जाणारा हा शब्द आर्य व द्रविड यांच्या समाजांचे एकरूप होण्याचेच निदर्शक आहे असे नव्हे तर त्यांच्या भाषांचेही एकरूप होण्याचे निदर्शक आहे. डॉ. एस. एम. कत्रे यांनी डॉ. इरावती कर्वे यांना सुचविल्याप्रमाणे हा शब्द 'वधू' ह्या संस्कृत शब्दाशी 'अण्णी' (अण्णा ह्या शब्दाचे स्त्रीलिंगी रूप) या द्राविडी शब्दाचा सामासिक संबंधाने योग झाल्याने 'वधू + अण्णी', पुढे प्राकृतरूप 'वहू + अण्णी' व नंतर 'वहिणी-नी' अशा क्रमाने निष्पन्न झाला आहे. त्यातही 'आ' – 'ई' पुंल्लिग– स्त्रीलिंगवाचक प्रत्यय विशेषेकरून आर्यभाषेतील आहेत. म्हणूनच 'वहिनी' शब्द आर्य व द्रविड तत्त्वांचे एकजिनसीकरण मराठी भाषेत कसे झाले असावे याची स्पष्ट कल्पना करून देणारा आहे.

मराठीतील 'मामंजी' हा शब्दसुद्धा या संदर्भात रोचक आहे. सून आपल्या सासऱ्याला उद्देशून हा शब्द वापरते. मुलीने मामाच्या मुलाशी लग्न करावे ही प्रथा व मुलीने प्रत्यक्ष मामाशीच लग्न करावे ही प्रथा अशा दोन्हीही द्राविडी आहेत. आजही तेलुगूभाषी गृहस्थ सजातीय विवाहित गृहस्थाला 'मामा' म्हणून संबोधित करताना दिसतो. याच्या मुळाशी आपल्या मुलीशी पुढच्या काळात होऊ शकणारा संभाव्य विवाह-संबंध हाच आहे. 'मामा' हा शब्द जरी द्राविडी नसला (कदाचित असेलही) तरी या शब्दाचा 'सासरा' या अर्थाने करण्यात येणारा प्रयोग मात्र खास द्राविडी आहे. हा प्रयोगही दोन समाजांच्या अभिन्नीकरणाच्या प्रक्रियेचा निदर्शक आहे.

नातेसंबंधवाचक शब्दांच्या उदाहरणांवरून समाजव्यवहाराच्या माध्यमातून दोन प्रकारे मराठीचा विकास झाला आहे. एक असे, की द्राविडी शब्द सरसकट घेण्यात आले. दुसरे असे, की मूळ आर्य शब्दावर द्राविडी अर्थ रूढ करण्यात आला. हा दुसऱ्या प्रकारे मराठीवर झालेला परिणाम विशेष लक्षणीय व दूरगामी आहे.

४) **तालव्यीकरण :** अर्वाचीन मराठीत तालव्यीकरणाचा एक नियम आहे. त्याचा परिणाम च्, ज्, झ् आणि स् ह्या दन्त्य व्यंजनांचे रूपान्तर च्, ज्, झ् आणि श् ह्या तालव्य व्यंजनांत इ, ए, य् या ध्वनींच्या अगोदर आल्याने होते. संस्कृत शब्द सीता, सेवक, सेतू इत्यादी अपवाद सोडले, तर मराठी प्रमाणभाषेत व बोलीत हा नियम सार्वत्रिक रूपाने लागू होतो. प्रस्तुत लेखकाने म्हाताऱ्यांच्या तोंडून 'शिताबाई, शिताफळ' असे उच्चार ऐकले आहेत. हिंदी शब्द 'सेव' मराठीत 'शेव' झाला आहेच.

प्राचीन आर्यभाषेमध्ये तालव्य व्यंजने होती व ती अर्वाचीन आर्यभाषांमध्येही आहेत. च्, छ्, ज्, झ्, श् ही तालव्य व्यंजने बहुतेक सर्वत्र आहेत. याला समांतर दन्त्य वर्णांपैकी फक्त स् आहे. दन्त्य ज् अरबी-फारसीकडून उर्दूत आला. फक्त मराठी भाषेत समान्तर दन्त्य वर्ण च्, ज्, झ् असे आहेत. दन्त्य छ् विषयी पुढे चर्चा करण्यात येणार आहे. अर्वाचीन भारतीय आर्यभाषांपैकी दन्त्य घर्षवर्ण मराठीचेच वैशिष्टय मानावे लागेल व त्यातही तालव्यीकरण हे आणखी एक मराठीचे वैशिष्टय मानावे लागेल.

ज्यूल ब्लॉक या फ्रेंच विद्वानाने मराठीतील या वैशिष्टयासंबंधी मांडलेले विचार लक्षात घेण्यासारखे आहेत. ते म्हणतात, " संस्कृतमधील तालव्य व्यंजनांनी मराठीत सारखे उच्चार राखून ठेवलेले नाहीत. खरे तर, अ, उ आणि ओ या स्वरांच्या आधी त्यांचा घर्षण (शकार) गुण लोप पावला आहे. जुना उच्चार सातत्याने फक्त इ च्या आधीच सुरक्षित राखून ठेवण्यात येतो. ए च्या आधी तो सारखा नाही. शब्दारंभी तो साधारणतः तालव्य असतो ( शेळा ). शब्दाच्या मध्यात तो वेगवेगळा असतो; अशा प्रकारे आपण म्हणतो चोय, अधिकरण चोशेत, पण संबंधकारकाचे विकारी रूप त्याचा सारखे त्याचे आणि भविष्य प्रथम पुरुष एकवचन वाचेन धातुरूप वाचणे मधल्यासारखे" (ब्लॉक, पान ११०–१११). य् च्या आधीही संस्कृत शब्द सस्य, रहस्य इत्यादी वगळले तर या व्यंजनांचा दन्त्य उच्चार मराठीत सापडत नाही.

वरील दन्त्य उच्चार व तालव्यीकरणाचा नियम यांचे स्फूर्तिस्थान कोणते याचाही संकेत ब्लॉकच्या पुढील उताऱ्यातून मिळतो. " उच्चाराची अशी वैशिष्टचे असलेली मराठी हीच एकमेव भारतीय आर्यभाषा आहे. मराठीतील ही वैशिष्टचे दुसऱ्या भाषापरिवाराच्या / कुटुंबाच्या / समूहाच्या अशा भाषांतही समान आहेत ज्या पूर्वेला तिला लागून आहेत, म्हणजे तेलगू व द्राविडी भाषा; बहुतेक कोरकू, मुण्डाबोली." अनार्य भाषांकडून ही वैशिष्टचे मराठीत येण्यासाठी दोन संबद्ध समाजांचा अत्यंत निकटचा संबंध येऊन पुढे एकजिनसीपणा आल्याशिवाय भाषेवर इतका दूरगामी परिणाम होणार नाही. एका भारतीय आर्यभाषेची पुनर्रचनाच तालव्यीकरणाने झाली असे म्हणावयास हरकत नाही. हा मूलगामी बदल समाजव्यवहारातून झाला हेही विसरता कामा नये.

तालव्यीकरणाच्या प्रक्रियेत इ आणि य् च्या आधी अपवाद सापडत नाहीत, उच्चार तालव्यच हवा. शब्दांच्या मध्यभागी मात्र ब्लॉकने वर म्हटल्याप्रमाणे तालव्य किंवा दन्त्य असे दोन्ही उच्चार आढळतात. हा वैकल्पिक उच्चार पुणेरी बोलीतच विशेषेकरून पाहण्यात येतो. इतर बोलींमध्ये तालव्य उच्चारच केला जातो. तालव्यीकरणाच्या नियमामुळे उत्पन्न झालेला दन्त्य-तालव्य भेद बोलणाऱ्यांच्या मनात इतका रुजून बसलेला आहे, की त्याची परिणती लिखाणातही 'चार' च्या ऐवजी 'च्यार' व 'पंजाब' च्या ऐवजी 'पंज्याब' अशी झालेली प्रस्तुत लेखकाने पाहिलेली आहे. ब्लॉकने दाखविल्याप्रमाणे या नियमाचे दौर्बल्य फक्त ए च्या आधी व तेही शब्दाच्या मध्यभागी आहे व तेही पुणेरी बोलीत. ह्या दौर्बल्याचे कारणही भाषाविकास व समाजव्यवहाराच्या अन्योन्यसंबंधातच शोधावे लागेल.

या दौर्बल्याविषयी ब्लॉक म्हणतो, " इथे जरूर बोलभाषेतील विविधता राहिली असेल : अशा प्रकारे सर्व्हेने कोंकणात ए च्या आधी च चा दन्त्य उच्चार सामान्यपणे असल्याचे म्हटले आहे. " ( ब्लॉक, पान ११२) (इथे 'सर्व्हे' म्हणजे ग्रीयर्सनच्या **लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इण्डियाचा** संदर्भ ब्लॉकने दिला आहे. ) तर पुणेरी बोलीतील तालव्यीकरणाचे दौर्बल्य कोंकणातील बोलीच्या प्रभावामुळे उद्भवले असे म्हणावयास हरकत नाही, उलट, बराच वावही आहे. कोंकणातील मंडळी, विशेषतः भट मंडळी, ज्यांनी पुढे अनेक छत्रपतींच्या कारकीर्दीत पेशवेपदासारखी उच्च पदे भूषविली, जी कोंकणातून आली होती. त्यांनी स्वतः-बरोबर कोंकणातून बरीच विश्वासू मंडळीही आणली होती व बरीच मंडळी त्यांच्या आश्रयास नंतरही येत गेली. पुण्यनगरी व आसमन्तात या कोंकणी मंडळींचे अनेक दशके एकछत्री राज्य होते. सामाजिक प्रतिष्ठेत ते सर्वांत वरचढ होते. त्यामुळे त्यांच्या भाषेलाही प्रतिष्ठा लाभली व समाजातील इतर वर्ग त्यांचे अनुकरण करू लागले. अशा प्रकारे त्यांच्या बोलीतील 'आमचे, असे' असे मृदु दन्त्य उच्चार पुणेरी बोलीत आले व ते तिचा स्थायीभाव झालेले आज दिसत आहेत. वर म्हटल्याप्रमाणे प्रत्येक समाजात घटकरूप भाषिक समूह असतात. या समूहांच्या बोली-भाषा एकमेकांवर आपसात सतत क्रिया-प्रतिक्रिया करीत असतात व या प्रतिक्रियेमुळेच एका बोलीचे गुणविशेष दुसऱ्या समुदायाच्या बोलीत संक्रमित होत असतात. साधारणतः ज्या समुदायाची सामाजिक प्रतिष्ठा अधिक असते त्याची बोलीभाषा कमी प्रतिष्ठित समुदायाच्या बोलीवर प्रभाव पाडते व तिचे गुणविशेष कमी प्रतिष्ठित बोलीत घेतले जातात. या पार्श्वभूमीवर पाहिले, तर कोंकणीतील ए च्या आधी घर्ष वर्णांचे मृदु दन्त्य उच्चार पुणेरी बोलीत कसे शिरले ह्याचे मूळ समाजव्यवहारात आहे हे स्पष्ट होते.

पुणेरी मराठी बोलीचे हे वैशिष्टच तिच्या भौगोलिक कक्षेतच मर्यादित राहिले नाही, तर आज ते सर्व महाराष्ट्रभर व त्याच्याही पुढे इतर भाषी प्रांतांत






असलेल्या मराठीभाषी समुदायांपर्यंत पोहोचू पाहात आहे. ह्या वैशिष्टचाचा झालेला व होणारा हा विस्तार समाजव्यवहाराच्या एका विशिष्ट भाषिक प्रक्रियेमुळे होतो आहे हेही इथे ध्यानात घेण्यासारखे आहे. ही प्रक्रिया आहे **प्रमाणीकरण.** समाजातील घटकभाषिक समुदायांपैकी आर्थिक, सामाजिक, राजनैतिक इत्यादी कारणांमुळे एक घटक वरचढ होतो व त्याची बोली प्रमाणभाषेचा आधार बनते व पुढे प्रमाणभाषा म्हणून विकसित होते. मराठीचेही असेच झाले. महाराष्ट्राचे पुढारीपण पेशवाईत व पुढेही पुणेरी मंडळींकडेच राहिले व अजूनही आहे असे म्हणता येईल. भाषा व साहित्य या दोन्ही क्षेत्रांत पुणेरी मंडळींचे प्राबल्य व पुढाकार असल्याने स्वाभाविकच पुणेरी बोलीचा तर प्रमाणभाषेवर पगडा बसलाच; परंतु प्रमाणभाषेच्या माध्यमातून इतर प्रदेशांतील मराठीभाषिकांच्या भाषेवरही परिणाम झाला. हल्लीच्या दृक्-श्राव्य माध्यमांच्या बाहुल्याने हा मृदु दन्त्य उच्चार प्रमाणभाषेच्या अन्य वैशिष्टचांबरोबर मराठीभाषिकांमध्ये सर्वत्र प्रसार पावतो आहे. प्रमाणभाषा आदर्श मानली जाते व म्हणूनच अनुकरणीय असते. ती बोलणारा प्रतिष्ठेस पात्र असतो. अशा अनुकरणामागे भाषेच्या माध्यमातून सामाजिक प्रतिष्ठाप्राप्तीची लालसा असते. हीच लालसा समाजातील सदस्यांना प्रमाणभाषा आत्मसात करण्यास प्रेरक ठरते. प्रत्येक समाजाचे सदस्य व घटकसमूह दुसऱ्यांच्या तुलनेत स्वतःची प्रतिष्ठा समाजव्यवहाराच्या माध्यमातून उंचावण्यासाठी प्रयत्नशील असतात. विशेषतः अनेक स्तरांत विभागलेल्या भारतीय व पर्यायाने मराठी समाजांत प्रतिष्ठाप्राप्तीची ही प्रक्रिया विशेष उठून दिसते. या प्रक्रियेत प्रमाणभाषा एक आयते साधन म्हणून ओळखली जाते व संबंधित व्यक्ती व घटकसमुदाय तिचा योग्य उपयोग केल्याशिवाय राहात नाहीत.

वरील चर्चेत उल्लेखिल्याप्रमाणे प्रमाणभाषेबरोबर तालव्यीकरणाला अपवाद असलेला दन्त्य उच्चार जरी सर्वत्र प्रसार पावत असला, तरी पुणेरी बोलीत तालव्यीकरण व अपवाद दोन्ही आढळतात. या विविधतेचे कारण जातीप्रमाणेदेखील बोलीत बदल होत असतात हा नियम आहे. नागपुरी व पुणेरीभाषिकांची तालव्यीकरणासंबंधी पाहणी केल्यानंतर जी माहिती एकत्र झाली ती साररूपाने थोडक्यात खालील तालिकेत देण्यात येत आहे.*

**तालव्यीकरण**

| घर्ष | नागपुरी | | | पुणेरी₁ | | | पुणेरी₂ | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| व्यंजन | – इ, | – य | – ए | – इ, | – य | – ए | – इ, | – य | – ए | |
| स् | + | + | + | + | + | (+) | + | + | – | नाम रूपसिद्धी प्रक्रिया |
| च्, ज्, झ्, | + | + | + | + | + | (+) | + | + | – | |
| स् | – | – | – | + | + | – | – | – | – | क्रिया रूपसिद्धी प्रक्रिया |
| च्, ज्, झ् | – | – | – | + | + | (+) | – | – | – | |

वरील तालिकेत नागपुरी बोलीचा सुशिक्षित प्रकार घेतला आहे. – ए च्या संदर्भात तालव्यीकरण अनिवार्य आहे. पुणेरी बोलीचे सर्व भाषिक उच्चशिक्षित होते. तरी पुणेरी₁ मध्ये तालव्यीकरण पुणेरी₂ च्या मानाने खूपच जास्त आहे.

* पुणेरीभाषिकांसंबंधी माहिती प्रस्तुत लेखकाने अमेरिकेच्या मिशिगन स्टेट युनिव्हर्सिटीमध्ये भाषाशास्त्राचे अध्यापन करीत असताना १९७२ ते १९७४ च्या दरम्यान तिथे असणाऱ्या व विद्यार्थी किंवा पाहुणे म्हणून येणाऱ्या पुणेरी व्यक्तींकडून एकत्र केली. नागपुरी बोलीसंबंधी माहिती नागपूरला १९७२–१९७४ च्या दरम्यान दोनदा आले असताना एकत्र केली. त्यानंतरही नागपूर व पुण्याच्या वास्तव्यात संबंधित निष्कर्षांची खात्री करून घेतली.

पृ. ३६ वरील तालिकेत तीन चिन्हे वापरली आहेत. त्यांचा अर्थ असा आहे '+' चा अर्थ 'तालव्यीकरण अनिवार्य' असा आहे. '(+)' चा अर्थ 'तालव्यीकरण वैकल्पिक किंवा ऐच्छिक' असा आहे. '–' चा अर्थ 'तालव्यीकरण नाही' असा आहे. '–स्वर' चा अर्थ 'स्वर परवर्ती असल्यास असा होतो. –ए च्या संदर्भातही एक अपवाद वगळता तालव्यीकरण वैकल्पिक असले तरी सर्वत्र आहे. या बोलीच्या बोलणाऱ्यांमध्ये कायस्थांचे प्राधान्य होते. पुणेरी₂ मध्ये तालव्यीकरण सर्वांत कमी आहे. –ए च्या संदर्भात होतच नाही. या बोलीत ब्राह्मणांचे प्राधान्य होते.

प्रमाणभाषा संपूर्ण समाजात आदर्श मानल्या जाऊन सर्वत्र बोलली जात असली तरी ती एका घटकसमुदायाचीच भाषा असते. जसे, वरील तालिकेत पुणेरी₂ आहे व भिन्न-भिन्न घटकसमुदाय स्वतःच्या बोलींची वैशिष्टये टिकवून असतात. जसे नागपुरी व पुणेरी₁ व पुणेरी₂. या विविधतेच्या मुळाशी वर म्हटल्याप्रमाणे घटकसमुदायाच्या अंतर्गत दळणवळणाची घनता व स्वतःची अस्मिता टिकवून ठेवण्याची चाड ही दोन कारणे होत. प्रमाणभाषेचे व बोलींचे सहअस्तित्व समाजव्यवहाराच्या त्या वैशिष्टयाची ग्वाही देते. ज्यायोगे विविधता असूनही समाजव्यवहार निरंतर चालू असतो. हेच वैशिष्टय प्रत्येक समाजातील दळणवळणाचा गाभा आहे.

५) पुणेरी च्छ : संस्कृतातून अनेक संयुक्त व्यंजने मराठीत आली आहेत. त्यांपैकी 'त्स' ही युती एक आहे. पुणे हे ब्राह्मण संस्कृतीचे व पर्यायाने संस्कृतचे बऱ्याच काळापासून केंद्र असल्याने अनेक संस्कृत शब्द पुणेरी बोलीत सहज वापरण्यात येतात, उदाहरणार्थ, उत्सव, मत्सर, कुत्सित, उत्साह इत्यादी. या शब्दांचा उच्चार 'उच्छ्व, मच्छ्र, कुच्छित, उत्च्छाह' असा ऐकण्यात येतो. म्हणजे 'त्स' युतीचा उच्चार 'च्छ' असा पुणेरी बोली बोलणाऱ्यांच्या तोंडून ऐकण्यात आला आहे. हा उच्चार स्त्रियांच्या तोंडून अधिक ऐकण्यात येतो. पुरुष मंडळी संस्कृतप्रमाणेच या युतीचा उच्चार करताना आढळतात. त्यांच्यापैकी काही पुरुष 'च्छ' उच्चार करीत असतील तर न कळे. च्छ च्या संदर्भात विशेष लक्षात घेण्यासारखी गोष्ट म्हणजे '–इ' च्या संदर्भात तालव्यीकरण सर्वत्र लागू होत असतानादेखील 'कुच्छित'मध्ये '–इ' असूनसुद्धा मृदु दन्त्य उच्चार पूर्ववत राहतो. या स्थळी जर आपण मराठीच्या ध्वनिव्यवस्थेचा विचार केला तर 'च्छ' या उच्चारातील परिवर्तनाचा परिणाम मराठीच्या संरचनेच्या दृष्टीने दूरगामी होऊ शकेल असे वाटल्याशिवाय राहात नाही.

मराठीत घोष-अघोष आणि अल्पप्राण-महाप्राण ह्या गुणांच्या आधारे प्रत्येक वर्गात चार व्यंजने आहेत. उदाहरणार्थ,

| | | | | |
|---|---|---|---|---|
| कण्ठ्य : | क् | ख् | ग् | घ् |
| तालव्य : | च् | छ् | ज् | झ् |
| मूर्धन्य : | ट् | ठ् | ड् | ढ् |
| दन्त्य : | त् | थ् | द् | ध् |
| | च् | | ज् | झ् |
| ओष्ठ्य : | प् | फ् | ब् | भ् |

नासिक्य वर्णांचा संबंध नसल्याने त्यांचा उल्लेख वरील तक्त्यात करण्यात आलेला नाही. फक्त दन्त्य स्थानी घर्षणयुक्त व्यंजनांत चार च्या ऐवजी तीनच व्यंजने आहेत. ख्, छ्, ठ्, थ्, फ् प्रमाणे अघोष महाप्राण व्यंजन दन्त्य–घर्ष व्यंजनांच्या वर्गात अस्तित्वात नाही.

हे छ् व्यंजन पुणेरी बोलीच्या माध्यमातून, एका फारच मर्यादित संदर्भातच का होईना, मराठीत अस्तित्वात आले आहे. आज ते स्वतंत्रपणे आढळत नाही तर फक्त 'च्, छ्' या युतीतच आढळते. अजून वरील तक्त्यातील रिकामी जागा भरून निघायची आहे कारण 'छ्' ला स्वतंत्र अस्तित्व नाही. परंतु पुढे हे व्यंजन भाषेत योग्य तो बदल होऊन विशिष्ट संदर्भाच्या पकडीतून बाहेर पडून स्वतंत्र होणार नाही याची हमी देता येत नाही. या बदलाला वेळ लागू शकतो; पण शक्यता नाकारता येत नाही.

या संदर्भात भाषाविकासाच्या व समाजव्यवहाराच्या दृष्टिकोणातून महत्त्वाचा निष्कर्ष असा काढता येतो, की हा बदल मराठीच्या स्त्रीबोलीने घडवून आणलेला आढळतो. समाजाच्या अनेक घटकरूप भाषिक समुदायांमध्ये स्त्री-भाषा/बोलीसमुदाय हाही तितकाच महत्त्वाचा घटक असतो जितके अन्य समुदाय. भाषा घटकरूप बोलींच्या निरंतर क्रिया–प्रतिक्रियांनी घडत असते व मराठी या नियमाला अपवाद नाही. मराठी ही समाजव्यवहाराच्या संदर्भात एक गतिशील व्यवस्था आहे हेही याने सिद्ध होते.

६) वऱ्हाडी-मराठी वाद : पुणेरी-मराठी सामाजिक व राजकीय कारणांमुळे प्रमाणभाषेच्या पदावर




आरूढ झाल्यापासून अनेक दशके तरी तिच्या पदाला, प्रतिस्पर्धी नसल्यामुळे, आव्हान नव्हते. तिला पहिले आव्हान कोंकणी बोलीकडून मिळाले. कोंकणी बोली पुणेरी बोलीला प्रमाणभाषेच्या पदावरून अपदस्थ करू शकली नाही, तरी तिला स्वतःला भाषेचा दर्जा मिळविता आला. कोंकणीला भाषा म्हणून पहिली मान्यता १९७५ साली साहित्य अकादमीने दिली व अलीकडेच १९८७ साली, गोव्याला राज्याचा दर्जा मिळण्याआधीच, कोंकणी राज्यभाषाही झाली. गोव्यात आजही जरी कोंकणी-मराठी वाद असला, तरी गोव्यात शासकीय दृष्टचा मराठीपेक्षा ती वरचढ झालेली आहे, हे सत्य आहे. कोणाला 'वरचढ' हा शब्द मान्य नसेल तर कोंकणी मराठीच्या 'समकक्ष' झाली आहे एवढे तरी मान्य करण्यास कोणाची हरकत नसावी.

पुणेरी बोलीच्या अढळ पदाला दुसऱ्या आव्हानाचा प्रारंभ वैदर्भी किंवा वऱ्हाडी बोलीकडून झाला आहे. वऱ्हाडी ही विदर्भाची बोली आहे. तिचे अनेक उपभेदही आहेत. त्यांतील नागपुरी बोली एक होय. खेड्यांतील व शहरांतीलही समाजव्यवहाराच्या अपेक्षा पूर्ण करण्यास ती पूर्णपणे समर्थ आहे. शहरात जरी सामान्यतः प्रमाण मराठी किंवा तिच्याच कोणत्या तरी प्रकाराचा वापर होत असला, तरी योग्य प्रसंगी वऱ्हाडीच्या बोलीचा वापर होत असतो. विशेषतः नोकरवर्गाशी बोलताना, भाजीबाजार करताना, इत्यादी प्रसंगी बोलीभाषेचा वापर होत असतो. १९७० च्या दशकात वऱ्हाडी चळवळीला सुरुवात झालेली दिसते. ही चळवळ संथ गतीने पण सातत्याने चालत असलेली दिसते. दरवर्षी न चुकता वऱ्हाडी साहित्य-संमेलन भरते. साहित्याचे काव्य, कथा, कादंबरी, नाटक इत्यादी अनेक प्रकार वऱ्हाडी भाषेत रचले जात आहेत. रेडिओ-दूरदर्शनवरही वऱ्हाडीवरील सभा-संमेलने, त्या भाषेतील काव्यगायन इत्यादी कार्यक्रम प्रसारित केले जातात. गणेशोत्सवासारख्या सामाजिक समारंभांत वऱ्हाडीतून कथा-कथन इत्यादी मनोरंजनाचे कार्यक्रम आयोजित केले जातात. अनेक वर्तमानपत्रांनी स्वतःची वऱ्हाडी सदरे सुरू केली आहेत. त्यांच्यापैकी नागपूरच्या दैनिक 'तरुण भारत'ने सुरू केलेल्या '**बंडी उलार झाली**' या सदराचे यश डोळ्यांत भरण्यासारखे आहे. हे सदर अनेक महिने चालले व त्याला प्रतिसादही—लेखकांचा व वाचकांचा—दोहोंचाही—भरघोस मिळाला. अलीकडेच डिसेंबर १९८७ मध्ये 'मेड इन इंडिया' ही पुरुषोत्तम बोरकरांची वऱ्हाडी भाषेतील कादंबरी प्रकाशित झाली आहे. सभा-संमेलनांमध्ये प्रमाणभाषेच्या माध्यमातून पुणेरी बोली नागपूर-वऱ्हाडच्या लोकांवर लादली गेली अशी त्वेषभावनाही व्यक्त होताना दिसते. एकंदर वऱ्हाडीची चळवळ बाळसे धरते आहे असे म्हटले तर वावगे होणार नाही. प्रस्तुत लेखकाने आपल्या 'विदर्भ : अस्मितेच्या शोधात' अशा इंग्रजी शीर्षकार्थाच्या लेखात यासंबंधी अनेक मुद्द्यांचा ऊहापोह केलेला आहे. विशेषतः ऐतिहासिक काळापासून विदर्भाचे व्यक्तिमत्त्व अगदी आगळेवेगळे होते, ते हळूहळू अस्पष्ट होत गेले. अलीकडच्या काळात तर विदर्भाला अस्मिता हरवल्यासारखे झाले आहे, ती तो शोधण्याच्या व पुन्हा मिळविण्याच्या प्रयत्नात आहे, व वेगळा विदर्भ किंवा महाविदर्भ राज्याची मागणी आणि वऱ्हाडी भाषेची चळवळ या दोन्ही गोष्टी त्याच प्रयत्नांचा एक भाग आहेत, इत्यादी बाबींचा विस्ताराने परामर्श घेतला आहे. या प्रसंगी अस्मितेच्या चळवळीत भाषा कशा प्रकारे योगदान करते हे समजून घ्यावयास हवे.

वर म्हटल्याप्रमाणे प्रमाणभाषेबरोबर बोली सहअस्तित्व टिकवून समाजव्यवहारात सहभाग करतात. बोली बोलणारा समुदाय स्वतःची अस्मिता व वेगळेपण टिकवून ठेवण्यास प्रयत्नशील असतो. अशा प्रयत्नात ती बोली सर्वग्राही प्रतीक म्हणून उपयोगी पडते. भाषेच्या अनेक सामाजिक गुणांपैकी तिची सर्वग्राही प्रतीकक्षमता हा गुण सर्वंकष असतो. वर—वर राजकीय-राष्ट्रीय दिसणारा संघर्ष मुळाशी भाषिक असतो. या संदर्भात बांगला देशाचा १९७० पर्यंत पश्चिम पाकिस्तानशी संघर्ष व श्रीलंकेत तमिळांचा चालत असलेला संघर्ष ही दोन उदाहरणे देता येतील. दोन्ही संघर्षांत बांगला व तमिळ ह्या भाषा अशा प्रतीकांच्या रूपाने समोर आल्या. हेच दृश्य आज वऱ्हाडी चळवळीच्या संदर्भात दिसते आहे. ती वैदर्भी अस्मितेचे प्रतीक म्हणून पुढे करण्यात येत आहे. ज्याप्रमाणे कोंकणीला राज्याश्रय मिळाला तसा वऱ्हाडीलाही पुढे मिळाला तर आश्चर्य वाटावयास नको. किंबहुना राज्याश्रय प्राप्त करून घेणे ही या चळवळीतील पुढची नैसर्गिक पायरीच म्हणावी लागेल.

समाजव्यवहारात बोलीभाषांच्या योगदानाचे आकलन करताना दुसरा महत्त्वाचा व लक्षात ठेवण्या-

सारखा मुद्दा असा आहे, की समाजातील सर्व भाषिक-समुदाय एक गतिशील संतुलन राखून असतात. ह्या गतिशीलतेचे प्रमुख कारण सांगताना हाउगेन (पान १०८) हा अमेरिकन विद्वान म्हणतो की, 'प्रमाण-भाषेला प्रतियोगी भाषांकडून, साधारणत: ज्यांना बोलीभाषा म्हणतात, सतत धोका असतो. तिचा उपयोग करणाऱ्यांमध्ये बोलीभाषांकडून ती ढवळाढवळीस व कालान्तराने पूर्णपणे विच्छिन्नीकरणास पात्र ठरते.' अशा प्रकारे एकाच समाजात संबंधित बोली व प्रमाण-भाषेच्या पदावर आरूढ असलेली बोली यांच्यात प्रमाणभाषेच्या सर्वोच्च पदाकरिता निरंतर स्पर्धा सुरू असते.

महाराष्ट्राच्या सध्याच्या परिस्थितीत हाउगेनचे वरील मत पूर्णांशी नसले, तरी बऱ्याच अंशी लागू पडत असलेले दिसते. पुणेरी बोली प्रमाणभाषा असल्या-बद्दल खंत बाळगणारे भाषिकवर्ग अस्तित्वात आहेत व तिला टक्कर देण्याच्या मन:स्थितीतही आहेत हे सत्य नाकबूल करून चालणार नाही व नजरेआडही करता येणार नाही. या परिस्थितीतून दोन पर्याय समोर येताना दिसतात.

**एक पर्याय** हाउगेन याने म्हटल्याप्रमाणे आताच्या प्रमाणभाषेचे विच्छिन्नीकरण व दुसऱ्या एका बोलीचे प्रमाणभाषेच्या पदी आरोहण. कदाचित हा पर्याय नॉर्वेसारख्या लहान देशात शक्य असेलही. नॉर्वेचा भूभाग छोटा आहे. आधुनिक सार्वजनिक दळणवळणाच्या सोयींमुळे एकापेक्षा अधिक बोली प्रमाणभाषा असणे कदाचित अशक्य असेल. इथे हे नमूद करणे आवश्यक वाटते, की हाउगेन याने नॉर्वेवरील भाषिक परिस्थितीवर मुख्यत्वेकरून काम केले आहे. परंतु भारतासारख्या खण्डप्राय देशात व महाराष्ट्रासारख्या विस्तृत भूभागा-सही हा पर्याय लागू पडण्यासारखा नाही.

**दुसरा पर्याय** महाराष्ट्राच्या सध्याच्या परिस्थितीत विकसित होताना दिसतो. महाराष्ट्र हा विस्तृत भूप्रदेश आहे. संबंधित बोली स्वत:च्या विवक्षित क्षेत्रात प्रमाण-भाषा म्हणून राहू शकते. हेच कोंकणी भाषेच्या बाबतीत झालेही आहे. हेच वऱ्हाडीच्या बाबतीतही होऊ शकते. अलीकडे ग्रामीण साहित्याची चळवळ सक्रिय झालेली दिसते. तिला अनुसरून ग्रामीण जीवनाचे निकोप व वस्तुनिष्ठ चित्रण त्या त्या ग्रामीण बोलीतच करा-वयास हवे तेव्हाच ते खरे चित्रण होऊ शकेल अशी ग्रामीण साहित्यनिर्मितीची मूलभूत भूमिका आहे. मराठीभाषी प्रदेशात ग्रामीण भाषेत बरीच साहित्यनिर्मि-तीही झाली आहे. पण एवढ्यानेच पुणेरी–अधिष्ठित प्रमाणभाषा विच्छिन्न होणे अनिवार्य वाटत नाही. ती आपल्या स्वत:च्या प्रदेशात व शासकीय–राजकीय क्षेत्रांत संपूर्ण महाराष्ट्राकरिता संपर्कभाषा म्हणून अस्तित्वात राहू शकते. हे कोंकणीला प्राप्त झालेल्या मराठी–समकक्ष दर्जाने दाखवून दिले आहे. याचबरोबर कोंकणीचे उदाहरण आणखी एक पैलू प्रगट करते. तो असा : कोणतीही बोली प्रमाणभाषेचा दर्जा मिळवून समाधानी राहात नाही. ती पुढे राज्याश्रय मिळविण्याचा प्रयत्न करते. कोंकणीने गोवा राज्याची राज्यभाषा होऊन तो मिळविला. वऱ्हाडीच्या संदर्भात इथे नमूद करावयास हवे, की नागपूर–विदर्भासह महाविदर्भ राज्याची मागणी कमीत कमी चाळीस वर्षे तरी जुनी आहे. अधून-मधून ही मागणी उफाळून येत असताना दिसते. वरून सर्व शांत दिसत असले, तरी आतून विस्तव धगधगतो आहे. ह्याविषयी संशय बाळगा-वयास नको. म्हणून महाराष्ट्राच्या विशिष्ट परिस्थितीत मराठीच्या अनेक पर्यायी प्रादेशिक प्रमाणभाषा विकसित होणे अधिक वास्तववादी वाटते.

पुढच्या काळात मराठीच्या प्रत्येक प्रमाणभाषेला राज्याश्रय मिळो न मिळो, एकप्रमाण मराठीपासून बहुप्रमाण मराठी अस्तित्वात येऊ शकते. प्रतिस्पर्धी बोलींच्या प्रमाणीकरणाच्या अशा चुरशीत प्रत्येक बोलीने, सध्या क्रमश: व्यापून असलेल्या जीवनानु-भवांच्या मर्यादा ओलांडून आणखी पलीकडे असलेल्या सर्व प्रकारच्या जीवनानुभवांची सशक्त अभिव्यक्ती करण्याची क्षमता संपादन करावयास हवी. हे विस्तारी-करण होत असताना भाषेचे नवीन सक्षम रूप (form) विकसित करावे लागेल. विकसनाच्या अशा प्रयत्नात पुन्हा त्या त्या बोलीभाषेला सध्या अस्तित्वात असलेल्या पुणेरी बोलीवर आधारित प्रमाण-भाषेची मदत प्रामुख्याने घ्यावी लागणार आहे. शिवाय इंग्रजी, हिन्दी इत्यादी प्रभावी भाषांकडून या रूप-विकसनाच्या प्रयत्नात अनायासेच योगदान होणार आहे. अशा प्रकारची विकसनाची प्रक्रिया आज सक्रिय आहे, हे वऱ्हाडी किंवा अन्य बोलींतील ग्रामीण साहि-त्याचे परीक्षण केल्याने स्पष्ट होते. विकसनाच्या अशा प्रक्रियेच्या माध्यमातूनच मराठीच्या अनेक प्रमाणभाषा

बरोबरीच्या दर्जाने एकमेकांकडून देवाण-घेवाण करून परस्परांच्या जवळ येतील व दळणवळणाच्या विपुल साधनांमुळे त्यांच्यात सारखेपणा येऊन संपूर्ण महाराष्ट्राकरिता पूर्वीपेक्षा अधिक संपन्न व सक्षम असलेली एक **नवीन प्रमाण मराठी भाषा** विकसित होऊ शकेल जी महाराष्ट्राच्या प्रत्येक क्षेत्रातील अभिव्यक्तीच्या अपेक्षा पूर्ण करू शकेल.

## सारांश व निष्कर्ष

भाषाविज्ञान व समाजभाषाविज्ञान यांच्या वेगवेगळ्या भूमिकांचा विचार करताना असे आढळते, की भाषाविज्ञान जेथे प्रामुख्याने भाषा-व्यवस्थेचा विचार करते व अनेक प्रकारच्या परिवर्तनांकडे स्वच्छन्द किंवा मुक्तपरिवर्तन म्हणून दुर्लक्ष करते तेथे समाजभाषाविज्ञान अशा दुर्लक्षिलेल्या व दखल न घेतलेल्या परिवर्तनांमध्ये सामाजिक दृष्टचा प्रयोजन व व्यवस्था शोधण्याचा व स्थापण्याचा प्रयत्न करते. या प्रयत्नातच समाजव्यवहाराच्या दृष्टिकोणातून प्रमाणभाषा व बोलींच्या अभ्यासाचा अंतर्भाव होत असतो. समाजातील भाषा व बोलींतील भेद दळणवळणाच्या घनतेतून किंवा विरळतेतून निर्माण होत असतात. भाषिक समाज बोलींच्या भिन्न भिन्न भाषिक घटकसमुदायांच्या आपापसांतील क्रिये-प्रतिक्रियेने बनत असतो. समाजातील भाषा व बोली यांचा त्या त्या व योग्य अशा सामाजिक संदर्भात प्रयोग ठरलेला असतो. सामाजिक संदर्भ नसलेली भाषा अस्तित्वात असणेच शक्य नाही. सामाजिक संदर्भ चुकला तर दळणवळणात अनर्थ उद्भवू शकतो. प्रत्येक भाषा घटक-रूप सामाजिक बोलींची एक व्यवस्था असते. या बोलींचा यथायोग्य सामाजिक संदर्भात उपयोग, हा त्या व्यवस्थेचाच एक भाग असतो. सामाजिक दृष्टिकोणातून भाषेचा विचार करताना म्हणूनच जननसंबंधाचा विचार अप्रस्तुत असतो. तिचा फक्त सामाजिक प्रयोजनांच्या दृष्टिकोणातूनच विचार केला जातो.

वरील तात्त्विक भूमिकेतून मराठीच्या विकासाचा विचार केल्यास तिचा विकास समाजव्यवहारातूनच घडत गेला असे म्हणणे वावगे होणार नाही. मराठीची उत्पत्ती वाणिज्यभाषेच्या रूपाने एका विशिष्ट व मर्यादित समाजव्यवहाराच्या प्रकारातून झाली. 'मराठी' शब्दाच्या व्युत्पत्तीत 'वाणिज्यभाषे'चा अर्थ अंतर्भूत आहे. 'मरहट्ट'मधील 'हट्ट' हा 'हाट' किंवा बाजार' या अर्थाचा द्योतक आहे. अशा प्रकारे 'उर्दू'-प्रमाणे 'मरहट्ट' शब्ददेखील मराठीची उत्पत्ती बाजारासंबंधीच्या भाषिक प्रक्रियेतून झाली हे दर्शविण्यास सार्थ व सक्षम आहे. वाणिज्यभाषेच्या रूपाने उत्पन्न होणारी मराठी भाषा मुळात आर्यभाषा असून द्राविड भाषांकडून तिला खूप काही मिळाले आहे. आर्य व द्रविड या दोन्ही तत्त्वांचा मिलाप होऊन, किंबहुना मूळच्या आर्यव्यवस्थेत योग्य ती द्राविड तत्त्वे बेमालूमपणे आत्मसात अथवा समरस झाल्याने, एकजिनसी मराठी समाज व भाषा यांचा विकास झाला. याचा पुरावा मराठीच्या काही वैशिष्टचांत सापडतो. वाणिज्य प्रक्रियेसंबंधी काही शब्दांचा विचार करता ते शब्द मूळचे द्राविड आहेत असे आढळून येते. वाणिज्य-भाषेच्या विकासाच्या प्रक्रियेत व्याकरणातील अनेक भेदांची पडझड होते. हे नागपुरी बोलीच्या लिंगभेदांचा विचार करता, मराठीच्या संदर्भातही झाले आहे हे स्पष्ट होते. मराठीतील अनेक व मूलभूत नातेसंबंधवाचक शब्द द्राविडी आहेत. ते आर्य व द्राविडांच्या पूर्वी आलेल्या मर्यादित वाणिज्यसंबंधातून पुढे एकजिनसी समाज व भाषेचा विकास झाला हे प्रामुख्याने व प्रकर्षाने दाखवून देतात. तालव्यीकरण हेही एक वैशिष्टच असे आहे जे द्राविड समाजाशी मराठी प्रदेशात आर्यांच्या आलेल्या अतिघनिष्ठ संबंधाचे दिग्दर्शक आहे. यात परवर्ती ए असताना घर्ष व्यंजनांचा दन्त्य उच्चार पुणेरी मराठीत कोंकणीच्या वर्चस्वामुळे आला. हे वैशिष्टच कोंकणी बोलणाऱ्या शासकवर्गाच्या व पर्यायाने कोंकणी बोलीच्या एके काळी असणाऱ्या प्रतिष्ठेचे व प्रभावाचे निदर्शक आहे. पुणेरी दन्त्य च्छ् हे स्त्रीबोलीचे मराठीला होऊ घातलेले योगदान असावे. वऱ्हाडी-मराठीवादाचा आढावा घेतल्यास असे आढळून येते, की पुणेरी बोलीवर आधारित मराठीच्या प्रमाणभाषेला कोंकणी, वऱ्हाडी इत्यादींच्या रूपाने प्रतिस्पर्धी विकसित होण्याच्या बेतात आहेत. पुढच्या काळात स्वतःच्या भूभागात ह्या बोली प्रमाणभाषेच्या रूपाने विकसित होऊ शकतात. महाराष्ट्र हा कालान्तराने एक बहुप्रमाणभाषाप्रदेश म्हणून विकसित होऊ शकतो. या विकसनाच्या प्रक्रियेतूनच मराठीच्या भाषा एकमेकांच्या जवळ येतील व या सर्वांची मिळून एक नवीन मराठी प्रमाणभाषा विकसित होऊ शकेल जी संपूर्ण महाराष्ट्र समाजाच्या आकांक्षांची परिपूर्ती करेल. प्रमाणीकरणातूनच समानीकरण साध्य होईल.

## संदर्भ-सूची


Bloch, Jules : '*The Formation of the Marathi language*', Original French Edition; 1914; English translation by D. R. Chanana – 1970; Motilal Banarasidas; Delhi.

Bloomfield, Leonrd : '*Language*'; 1933; Holt Reinhart, New York.

Burrow, Thomas : '*Collected Papers on Dravidian Linguistics*'; Department of Linguistics; Publication No. 13; 1968; Annamalai University, Annamalainagar, Tamil Nadu.

Chatterjee, Suniti Kumar : '*Into-Aryan and Hindi*'; 1960; Firma K. L., Mukhopadhyay, Calcutta-12.

Chomsky, Noam : '*Aspects of the Theory of Syntax*'; 1965; The M. I. T. Press, Cambridge, Massachusetts, U. S. A.

Gumperz, John : 'Dialect differences and social stratification in a North Indian Village'; *American Anthropologist*; Vol. 60; August 1958; pp. 668–682.

Gune, P. D. : '*An Introduction to Comparative Philology*'; 1962; Poona Oriental Book House, Poona-2.

Karve, Iravati : '*Kinship Organization in India*'; Deccan College Monograph Series–II; Poona.

Khokle, Vasant : a) 'Syllable in Marathi Phonology'; *Nagpur University Jaurnal*; Vol. 35; 1984-85 and 1985-86; pp. 179–194.
b) 'Vidarbha in Quest of Identity'; **विदर्भ-प्रज्ञा**- 87; ed. by Kukde and Ayachit; 26, Friends Colony, Pratapnagar, Nagpur-22.

Haugen, Einar : 'Dialect, Language and Nation', in *Sociolinguistics*; ed. by J. B. Pride and J. Holmes; Penguin Books; 1979; Originally printed in *American Anthropologist*; Vol. 68; pp. 922–35.

Master, Alfred : '*A Grammar of Old Marathi*'; 1964; Oxford University Press, London.

कुलकर्णी, कृ. पां. : क) "**मराठी भाषा-उद्‌गम व विकास**"; १९६९; मॉडर्न बुक डेपो प्रकाशन, पुणे- ३०.
ख) "**मराठी व्युत्पत्तिकोश**".

जोशी, प्र. न. : "सुबोध भाषाशास्त्र"; १९६३; सुविचार प्रकाशन मंडळ, पुणे-३०.

वैद्य, सु. द. गोसावी, र. रा. सहस्त्रबुद्धे, स. वि. देव : "मराठीचे भाषाशास्त्र"; १९६२; मोघे प्रकाशन, कोल्हापूर.






अनुक्रमणिका








# ज्ञानेश्वरीची हेमाद्रि-प्रत आणि तुका विप्र

सु. बा. कुलकर्णी

'नवभारत' मासिकाच्या एप्रिल, १९९० च्या अंकातील माझ्या 'ज्ञानेश्वरीचा लेखनकाल' या निबंधात ज्ञानेश्वरीचे आद्य प्रतिलेखन शके १२०८ मध्ये झाले होते असे प्रतिपादन मी केले होते. या प्रतिपादनाचा मुख्य आधार ज्ञानेश्वरीच्या सर्व प्रतींत आढळणारी पुष्पिका होती. या पुष्पिकेच्या प्रारंभी आढळणारा 'ऐसें युगीं वरि कळी' हा चरण कालनिर्देशात्मक आहे असे मी दाखवून दिले होते. त्यांतील संकेतांचा उलगडा केल्यावर 'ऐंशी', 'दोन' व 'एक' असे अंक प्राप्त होतात. 'अंकानां वामतो गतिः' या सूत्रान्वये त्यांचे वाचन शके १२०८ असे होते. ही प्रत हेमाद्रीने आपला स्वामी रामचंद्र यादव नृपती याच्यासाठी बनवून घेतली असावी असे मी अनुमान केले होते. या पुष्पिकेतील शब्दयोजना व हेमाद्रीने आपल्या व्रतखंड ग्रंथातील राजप्रशस्तीमध्ये केलेली शब्दयोजना यांमध्ये असलेले साधर्म्यही स्पष्ट केले होते.

माझ्या या सर्व प्रतिपादनास तुका विप्र यांच्या 'ज्ञानेश्वर–चरित्राख्याना'त पूर्ण पुष्टी मिळते, असे मला आता आढळून आले आहे.

तुकाराम भगवंत विपट ऊर्फ तुका विप्र हे एक सुप्रसिद्ध प्रवचनकार होते. डॉ. हर्षे यांनी यांचा काळ शके १६५१ ते शके १७१३ असा दिला आहे. यांची समाधी गोदातीरावर अंजनवती येथे आहे. यांनी शके १६९२ मध्ये २५० ओव्यांचे ज्ञानेश्वरांच्या चरित्रावरील एक आख्यान रचले होते. या आख्यानाची संहिता डॉ. रा. ग. हर्षे यांनी संपादित करून भारत इतिहास संशोधक मंडळाच्या त्रैमासिकाच्या ४६ व्या वर्षाच्या अंकात (इ. स. १९६८) प्रसिद्ध केली आहे (पृ. २५ ते ३६). या ज्ञानेश्वर–चरित्राख्यानाचा लेखनकाल तुका विप्र यांनी पुढीलप्रमाणे नोंदविलेला आहे :

"नित्यनेम कथा । ब्रह्मपूर ठाणीं ॥
विठ्ठल रुक्मीणी । उरूं बुरूं ॥ २२२ ॥
चेइत्र वसंत । कृष्ण सप्तमीसी ॥
भोमवार निसी । कृष्णा तिरीं ॥ २२३ ॥
गत कालीच्यार । हजार आठसे ॥
सत्तर प्रत्यक्ष । चालियेले ॥ २२४ ॥
शालिवान शक । सोळासे ब्याणव ॥
श्रोता वक्ता देव । दत्तात्रेय ॥ २२५ ॥"

प्रस्तुत आख्यानाच्या या पुष्पिकेवरून ते शके १६९२ मध्ये रचले गेले हे कळते. विशेष म्हणजे शालिवाहन शकाच्या निर्देशावरोबरच तुका विप्र यांनी कलियुग वा युधिष्ठिर गणनेचे वर्षही नोंदलेले आहे. कलियुगाच्या वर्षांकातून ३१७९ उणे केले म्हणजे शालिवाहन शकाचे गतवर्ष प्राप्त होते व ३१७८ उणे केले म्हणजे प्रत्यक्ष वर्ष मिळते. तुका विप्र यांनी नोंदलेले कलियुगवर्ष ४८७० आहे. त्याचा शके १६९२ शी बरोबर ताळमेळ जुळतो.

## ज्ञानेश्वरीचा जन्म

तुका विप्र कीर्तनाच्या निमित्ताने महाराष्ट्रभर संचार करीत. कीर्तनासाठी लागणारी स्तोत्रे, आरत्या व आख्याने स्वतः रचीत. त्यांच्या नावावर सुदाम-चरित्र, भानुदासचरित्र, कालियामर्दन यांसारखी आख्याने नमूद आहेत. त्यांच्या ज्ञानेश्वर–चरित्राख्यानात कीर्तनासाठी लागणारा मनोरंजक मालमसाला ठासून भरलेला आहे. यामुळे त्यातील ऐतिहासिक भाग किती व काल्पनिक किती याची निवड करणे सोपे नाही. तुका विप्र यांनी आपल्या आख्यानामध्ये ज्ञानेश्वरांच्या लौकिक चरित्रासंबंधी दिलेली माहिती ही पारंपरिक साच्याची आहे; परंतु त्यांनी कथन केलेली ज्ञानेश्वरी-जन्माची कहाणी नावीन्यपूर्ण आहे.

रामदेवराव यादव यास गीतेचा खरा अर्थ जाणून घेण्याची फार उत्कंठा लागली होती. म्हणून त्याचा प्रधान हेमाडपंत हा लंकेला गेला असता त्याने येताना गीताभाष्याचे छप्पन भाषांतील छप्पन ग्रंथ आणले. परंतु त्यांतील एकही ग्रंथ राजाच्या

पसंतीस उतरला नाही. नेवाश्याचे ठाणेदार सचोपंत ऊर्फ सच्चिदानंदबावा हे हेमाडपंताच्या सेवेत होते. त्यांना हेमाडपंताने दौलताबादेस बोलावून घेतले व गीतेचा प्राकृत अर्थ करील असा विद्वान शोधून आणा अशी आज्ञा केली. अनायासे त्या वेळी ज्ञानदेवांचा मुक्काम नेवासे येथेच होता. सचोपंतांनी त्यांस गीताभाष्याचे काम अंगीकारावे अशी विनंती केली. निवृत्तिनाथांनीही ज्ञानदेवांस हे काम करण्याची आज्ञा केली व ज्ञानदेवांनी ती शिरसावंद्य मानली. सचोपंत तावडतोब कागद, शाई इत्यादी जमविण्याच्या कामास लागले. रात्र झाली. निवृत्ती, सोपान, मुक्ताई ही भावंडे झोपली. ज्ञानदेव जागेच होते. त्यांनी रात्रीच्या साडेतीन घटकांत देवालयाच्या भिंतीवर गीताटीका लिहून काढली !

दिवस उगवताच सचोपंत लेखण्या, कागद, शाई घेऊन आले व ज्ञानदेवांस नमन करते झाले. ज्ञानदेवांनी त्यांस गीतार्थ देवालयाच्या भिंतीवर अगोदरच लिहून ठेवला आहे असे सांगितले. सचोपंत चिंताग्रस्त झाले. देवालयाच्या भिंतीवरील गीतार्थ कोणी पुसून टाकला तर काय होईल ? सचोपंतांची चिंता निवृत्तिदेवांनी जाणली. त्यांनी ज्ञानदेवांस गीताटीका पोथीवर लिहिण्याची आज्ञा केली. ज्ञानदेवांनी तावडतोब आज्ञापालन केले. सचोपंतांच्या हातात लेखणी दिली व आपण स्वतः डिक्टेशन देऊ लागले. साडेतीन घटिकांत पोथी सिद्ध झाली ! तुका विप्रांनी या लेखनसिद्धीचा काळ कलियुग गणनेप्रमाणे 'गत केली च्यार । चार हजार तीनशें ।। नव्वद वरूसें । लोटलियां ।। १२६ ।।' असा नोंदविला आहे. चार हजार तीनशे नव्वद यांतून चार वजा केल्यावर ४३८६ हे कलियुगाचे वर्ष प्राप्त होते. या अंकातून ३१७८ उणे केल्यास शालिवाहन शकाचे प्रत्यक्ष वर्ष १२०८ हे मिळते. मुद्रित व अमुद्रित ज्ञानेश्वरांच्या पुष्पिकेत आढळणारा 'एसें युगीं वरि कळी' या शब्दप्रतीकांनी निर्देशिलेला काळही शके १२०८ असाच आहे.

तुका विप्र यांना कलियुग गणनेतील हा प्रतलेखनकाल कोठून मिळाला कोण जाणे ! परंतु त्याने ज्ञानदेव-कालखंडातील समस्यांची एक कोंडी फोडली आहे. तुका विप्र यांच्या या कालनिर्देशाने माझ्या पूर्वनिर्दिष्ट प्रमेयास पुष्टी मिळते व शके १२०८ मध्ये हेमाद्रीने रामदेवरावासाठी ज्ञानेश्वरीची प्रत बनवून घेतली असावी हे ऐतिहासिक सत्य हाती लागते.

## क्षेपकांचा गोंधळ

तुका विप्र यांच्या ज्ञानेश्वराख्यानात त्यांच्या पश्चात बरीच कोंबाकोंबी झालेली असावी. वास्तविक पाहता त्यांचे आख्यान ओवी क्र. २२५ बरोबर संपते. ओवी क्र. २२२ पासून २२५ पर्यंत त्यांच्या आख्यानाची पुष्पिका असून तीमध्ये काव्याचा लेखनकाल व लेखनस्थल यांचा निर्देश आहे. त्यानंतर येणारे आळंदी तीर्थ माहात्म्य, गुरुकृपेचा महिमा, ज्ञानेश्वरांची गुरुपरंपरा, तुका विप्रांची गुरुपरंपरा हा मजकूर प्रक्षिप्त असावा असे वाटते.

ज्ञानेश्वरीच्या लेखनसिद्धीचा काळ नोंदवितानाही प्रक्षेपांचा गोंधळ उपस्थित होतो. १२६ क्रमांकाच्या ओवीत 'गत केली च्यार । चार हजार तीनशें ।। नव्वद वरूसें । लोटलियां ।।' हा युधिष्ठिर शक नोंदविल्यावर लेखन व लेखनकालाचे पुर्नानिवेदन आले आहे. त्यात ज्ञानेश्वरीच्या बहुसंख्य प्रतींत आढळणाऱ्या सच्चिदानंदांच्या ओवीचा अनुवाद आहे. हा कालोल्लेख, 'शालीवान शके बारासे बारांत । सिद्ध झाला ग्रंथ । ज्ञानेश्वरी ।। १२७ ।। लेखीक जाहाले सदाचिदानंद ।। बाबा नाम शुद्ध । सचोपंत ।। १२८ ।। असा असून तो युधिष्ठिर शकाशी विसंगत आहे. शके १२१२ मध्ये युधिष्ठिर शकाची ४३९० वर्षे होतात. शालिवाहन शकाच्या या निर्देशामुळे 'गत केली च्यार' या पदाला अर्थ राहात नाही. एक तर या पुर्नानिवेदात्मक ओव्या प्रक्षिप्त असाव्या; वा तुका विप्र यांच्या मनातच लेखनकालासंबंधी गोंधळ असावा. परंतु शके १२०८ मध्ये हेमाद्रीच्या आज्ञेनुसार ज्ञानेश्वरीची प्रत तयार झाली होती हे वास्तव उरतेच.

## निवृत्तीनाथांनी ज्ञानेश्वरी पाण्यात बुडविली ?

साडेतीन घटिकांत ज्ञानेश्वरी लिहून झाल्यावर सचोपंतांनी दौलताबादेस जाऊन ती हेमाद्रीच्या स्वाधीन केली. हेमाद्रीने ती रामदेवरावापुढे आणून ठेवली. सचोपंतांच्या या कामगिरीबद्दल राजाने त्यांच्या मुलास चाकरीस लावले; व सचोपंतांस निरोप दिला.

हेमाद्रीने तो ग्रंथ वाचला व राजाने श्रवण केला. बाकनिसाने त्याचा फार्सीमध्ये अनुवाद केला ! ग्रंथाच्या श्रवणाने राजास वैराग्य उत्पन्न झाले व त्याने राज्यत्याग केला. राज्याचा कारभार पुत्राच्या स्वाधीन करून रामदेवराव हा हेमाद्री, सेनापती, व भोळा नावाचा






पाणक्या यांच्यासह वेरूळच्या लेण्यांत जाऊन बसला व ज्ञानेश्वरीचे पुरश्चरण करू लागला.

यानंतर देवळातील लेखाचे सचोपंतांनी एक महिन्यात पुनर्लेखन करून ज्ञानेश्वरीची प्रत सिद्ध केली व देवळाच्या भिंतीवरील लेखन पुसून काढले. परंतु या ग्रंथात चौदा विद्या, चौसष्ट कला व गुप्तधनासंबंधी माहिती असल्याने निवृत्तीनाथांनी तो ग्रंथ पाण्यात बुडविला. तथापि सचोपंतांनी 'ग्रंथ असो क्षितीं स्वामीराया' अशी विनवणी केल्याने तो पाण्याबाहेर काढला. या घालमेलीत ग्रंथातील 'नाना कळा व नाना साधनांच्या युक्ती समस्त गळोन गेल्या.' तेव्हा ज्ञानेश्वर म्हणाले, "आजपासून २९४ वर्षांनी एकनाथ त्यांचा शोध करील !" शके १५०६ मध्ये एकनाथांनी ज्ञानेश्वरीचे शुद्धीकरण केले हे तुका विप्र यांना माहीत असावे असे दिसते.

## ज्ञानेश्वराख्यानातील इतिहास

तुका विप्र यांच्या ज्ञानेश्वर–आख्यानातील मनोरंजनाचा भाग सोडून दिला तरीही काही ठळक ऐतिहासिक सत्ये हाती लागतात. वस्तुतः तुका विप्र हे काही ज्ञानदेव–समकालीन नव्हेत. ज्ञानदेवांनंतर जवळजवळ पाच शतकांनी त्यांनी हे आख्यान रचले आहे. त्याचा मूळ आधार विष्णुदास नामा, निळोबा पिंपळनेरकर इत्यादींच्या आख्यानांतील ज्ञानदेवांसंबंधीच्या मिथकथा हाच आहे. असे असले तरी ज्ञानदेव, रामदेव, हेमाद्री, सच्चिदानंद यांचा ज्ञानेश्वरीच्या निर्मितीच्या संदर्भात आलेला परस्परसंबंध व हेमाद्रि-प्रतीचा लेखनकाल, या माहितीचा स्रोत वेगळा असावा असे वाटते.

तुका विप्र यांच्या आख्यानामुळे ज्ञानेश्वरीचे लेखन शके १२१२ पूर्वीच झाले होते हे निश्चित होते. दुसरे म्हणजे, शके १२०८ मध्ये हेमाडपंडिताच्या आज्ञेने रामदेवराव यादवासाठी सच्चिदानंदबाबाने ज्ञानेश्वरीची प्रत बनविली होती हे होय. ज्ञानेश्वरीच्या पुष्पिकेत आढळणारा 'ऐसें युगीं वरि कळी' हा शालिवाहन शकातील कालनिर्देश व तुका विप्र यांच्या आख्यानातील 'गत केली च्यार । चार हजार तीनशें । नव्वद वरूसें । लोटलियां ॥' हा युधिष्ठिर शकातील कालनिर्देश एकच होत. ज्ञानेश्वरीतील पुष्पिकेचे (ओव्या क्र. १७८१ ते १७८४– शासनप्रत) लेखन हेमाद्रीच्या हातचे असावे. या पुष्पिकेचे भूतकाळी कथन शके १२०८ मध्ये ज्ञानदेव हयात नसावे हे सुचविते. यामुळे 'बाळछंद' अभंगातील 'चंद्रार्क तारांगणें रश्मीं' म्हणजे शके १२०२ हा ज्ञानदेवांचा निर्वाणशक खरा मानावा लागतो.

❋ ❋







# वाद्–संवाद्

मा. संपादक नवभारत यांस,

स. न. वि. वि.

मार्च १९९० चा ' नवभारत 'चा अंक जूनच्या दुसऱ्या पंधरवड्यात हाती आला. तारखेचा निर्देश करण्याचे कारण एवढेच की या अंकातील डॉ. रा. भा. पाटणकर यांचा ' आस्वादक समीक्षा–एक चकवा ' हा लेख वाचनात येण्यापूर्वी काही दिवसच आधी विलास सारंग यांच्या समीक्षेवरील एका व्याख्यानाचे की चर्चेचे संक्षिप्त वृत्त वाचनात आले होते.

मराठी भाषेतील खरे समीक्षक तीनच : दिलीप पुरुषोत्तम चित्रे, अरुण कोलटकर व आपण स्वतः ' असे सारंग यांचे विधान होते. ' रा. श्री. जोग, स. शि. भावे, म. द. हातकणंगलेकर यांना आपण मानत नाही का ' असे विचारल्यावर ' मानत नाही ' अशा आशयाचे त्यांचे उत्तर होते. रा. भा. पाटणकरांचे नाव या तिघांबरोबर होते की नाही हे आता आठवत नाही. परंतु नसावे; आणि असते तरी आद्य त्रयीत ते नाव नाही हे स्पष्टच आहे.

हे वृत्त चुकीचे असेल, किंवा माझे स्मरण मला दगा देत असेल, अशा दोन्ही शक्यता मी गृहीत धरलेल्या आहेत ( पाटणकर यांना सारंग यांच्याकडून ते सहज पडताळून पाहता येईल). सारंग यांचे मूल्यमापनही मी मानतो असे नाही. माझी या क्षेत्रातील भूमिका पूर्णपणे ज्ञाननिरपेक्ष असल्यामुळे मूल्यमापन किंवा मानापमान–मापन करण्याचा माझा अधिकार नाही.

माझी भूमिका केवळ चिकित्सक ( हेही कोणी मानले नाही तरी माझी हरकत नाही ) जिज्ञासूची आहे, आणि या भूमिकेतून पाटणकरांचा हा लेख मला अतिशय असमाधानकारक वाटतो. लेखातीलच एक वाक्य उद्धृत करावयाचे तर ' असा लेख कसा नसावा याचा हा लेख म्हणजे एक वस्तुपाठच आहे.'

परंतु मला नुसता शेरा मारावयाचा नाही तर असे म्हणण्यापाठीमागची माझी कारणेही स्पष्ट करावयाची आहेत; आणि त्या कारणांची समर्पक उत्तरे असली तर तीही मोकळ्या मनाने स्वीकारावयाची आहेत.

पहिला प्रश्न असा की हा लेख कोणी कोणासाठी लिहिला आहे ? अति विद्वानाने अति विद्वानांसाठी, विद्वानाने विद्वानांसाठी, विद्वानाने अन्य क्षेत्रांत काही गती असणाऱ्या व याही क्षेत्रात चिकित्सक जिज्ञासा असणाऱ्या माझ्यासारख्या लोकांसाठी की चिकित्सक अभ्यासकाने सामान्य वाचकांसाठी ? सामान्यतः विद्वानाने चिकित्सक जिज्ञासूंसाठी लिहिलेला लेख अशी भूमिका लेखकाच्या व संपादकांच्याही मनात असावी असे वाटते. ' नवभारत 'च्या व्यासपीठावर ती योग्यही आहे; परंतु पाटणकरांच्या मांडणीत मात्र या सर्व स्तरांची गल्लत झाल्यासारखे दिसते.

' मी व माझ्याशी सहमत असलेले समीक्षक ज्या प्रकारचे लेखन करीत आहोत त्याचे स्वरूप स्पष्ट व्हावे व त्याविषयीचे गैरसमज दूर व्हावेत या हेतूने प्रस्तुत लेख लिहिला आहे', असे पाटणकर म्हणतात. ( हे सहमत असणारे कोण यांची नामावलीही या ठिकाणी त्यांनी दिली असती तर माझ्यासारख्याला ते सोईचे झाले असते; कदाचित त्या समीक्षकांनाही ते उपकारक ठरले असते. पाटणकर यांनीच सांगितलेल्या कसोटीवर त्यांचा लेख उत्तीर्ण होऊ शकत नाही. ज्या चकव्यात ते वाचकाला नेतात त्यातून बाहेर पडण्याचा मार्ग ते वाचकाला दाखवत नाहीत; किंबहुना तो त्यांनाही माहीत आहे की नाही अशा संभ्रमात वाचक सापडतो.

सुरुवातीला पाटणकर यांनी घेतलेली मांडणीची भूमिकाच एका बाबतीत अपुरी व दुसऱ्या बाबतीत चूक आहे. पहिली बाब– तात्त्विक भूमिकेची– थोडी नंतर पाहू. परंतु केवळ इंग्रजी समीक्षकांचाच त्यांनी विचार केला आहे व त्याचे समर्थनही दिलेले आहे ते सर्वथैव चूक. ते लिहितात : ' एकूण इंग्रजी साहित्याचा येथील लेखक-वाचकांवर मोठा परिणाम झालेला आहे; अनेक इंग्रजी लेखकांकडे, साहित्यकृतींकडे, साहित्यप्रकार व



अनुक्रमणिका

लेखनपद्धती यांच्याकडे आपण अनुकरणयोग्य मॉडेल्स म्हणून पाहात आलेले आहोत. म्हणून इंग्रजी समीक्षकांबद्दल विचार करणे आपल्या विषयाच्या संदर्भात प्रस्तुत ठरेल असे वाटते.'

पाटणकरांचे हे वाटणे पूर्णपणे चुकीचे आहे. इंग्रजीत आदराने अनुवाद केला जावा असे संस्कृत भाषेतील साहित्य-टीकाकार पाटणकर यांना माहीत आहेत. मराठीत त्या तोलामोलाचे नसले तरी ज्यांचे काही विचार तरी एखाद्या जागतिक मान्यता असलेल्या भाषेतून जगापुढे येणे आवश्यक आहे असे वाटावे अशा तोलाचे काहीच लेखन कोणी केले नाही काय ? असल्यास ते कोणते ? त्याचे या विषयाच्या संदर्भात महत्त्व कोणते ? असे काही लेखन झालेच नाही असे पाटणकरांचे मत असेल तर मराठीतील सर्व लेखकांचे लेखन इंग्रजी न समजणाऱ्या चिकित्सक जिज्ञासूंसाठी केलेले लेखन या स्तरावरीलच राहील. ज्याला इंग्रजी समजते त्याने अशा परधार्जिण्या परभृत लेखनाकडे का वळावे ? जाणकाराने केवळ मूळ संदर्भ दिले की तो आपले मार्गक्रमण करू शकेल.

आता पाटणकर यांच्या स्वतःच्या तात्त्विक भूमिकेच्या मांडणीविषयी. या विषयाच्या संदर्भात ही मांडणी नीटपणे येणे हे अत्यंत महत्त्वाचे होते. (चिकित्सक जिज्ञासूला तेवढे ज्ञान असावयासच हवे अशी भूमिकाच घ्यावयाची असल्यास अर्थातच गोष्ट वेगळी) याविषयीचे पाटणकर यांचे विवेचन अपुरे व वाचकाला गोंधळात टाकणारे आहे. त्यांच्याच या ठिकाणच्या अन्य संदर्भातील उद्‌गारांचा पुनरुच्चार करावयाचा तर– 'ते विषयाबद्दल प्रस्तुत, नेमके खोलवर जाणारे, मर्मदृष्टी देणारे असे बोलत नाहीत; ते अवांतरच बोलत राहतात. किंवा विषयाबद्दल गोलमोल बोलतात, त्याच्या ठिकाणी निर्माण होणाऱ्या प्रस्तुत-अप्रस्तुत प्रतिक्रियांविषयी सांगत राहतात, या प्रतिक्रियांचा उपयोग विवक्षित मूल्यनाच्या पुष्टचर्थ करावयाचा असतो हे ते विसरतात व नुसतेच तात्कालिक प्रतिक्रियांना समांतर ठरतील असे भावाविष्कार वाचकांसमोर प्रस्तुत करतात. यातून (अर्थातच पुराव्याशिवाय केलेली) शेरेबाजी, भाषिक आतशबाजी, युक्तिवादाचा अभाव किंवा त्यातील भोंगळपणा इत्यादी अवगुण निर्माण होतात. आणि कोणत्याही समीक्षेत हे किंवा तत्सम अवगुण नसावेत अशी समंजस वाचकाची अपेक्षा असणे स्वाभाविक आहे.

हे व तत्सम अवगुण पाटणकर यांच्या या लेखात सर्वत्र आढळतात. स्वतः पाटणकर यांनाही तटस्थपणे त्यांनी आपल्या लेखाकडे पाहिले तर आढळून येतील.

केवळ संज्ञांच्या उपयोजनेच्या दृष्टीने पाहिले तरी पाटणकर आपली व्याख्या 'आस्वाद' या शब्दाबाबत स्पष्ट करीत नाहीत. 'रस' या शब्दाला साहित्य-शास्त्रात सामान्य व्यवहारातील त्याच्या अर्थापेक्षा वेगळा आशय आहे हे त्यांनी सांगणे स्वाभाविक आहे. 'आस्वाद' विषयी काय ? की संस्कृत साहित्यशास्त्रानेही याचा कधी काही विचारच केला नाही ? संज्ञेला तीन प्रकारचे (निदान) अर्थ असू शकतात. व्युत्पत्तिशास्त्राप्रमाणे निघणारा, एखाद्या शास्त्राने आपल्या शास्त्रीय चर्चेसाठी निश्चित केलेला, व तिसरा सामान्य जनव्यवहारातील. 'आस्वाद' याचा तिसरा अर्थ पाटणकरांना अभिप्रेत असावा असे वाटते. कारण ते असे सहज लिहून जातात : "या भिकार कादंबरीचा मी नुकताच आस्वाद घेतला, तो अखेरी संपला म्हणून हायसे वाटत आहे' हे विधान तार्किक दृष्टचाच चमत्कारिक (लॉजिकली ऑड) आहे असे तत्काळ लक्षात येते." या संज्ञेचे अन्य अर्थ त्यांनी लक्षात घेतले असते तर त्यांना कदाचित असे वाटले नसते.

पाटणकरांच्या तात्त्विक भूमिकेविषयी मला आकलन झालेला भाग चार ओळींत संपतो. ते लिहितात : 'अनुभवाच्या विनिमयाला निश्चितता येण्यासाठी विषयनिर्देशाची किमान अट पाळली गेलीच पाहिजे. (कांटने आपल्या क्रिटिक ऑफ अिस्थेटिक जजमेंटमधील पहिल्या मोमेन्टच्या तिसऱ्या छेदकात संवेदनेबद्दल केलेली चर्चा येथे फार प्रस्तुत आहे. जिज्ञासूंनी ती जरूर पहावी)' असे लिहिणे म्हणजे अति विद्वानांसाठी लिहिण्याचा प्रकार झाला. (बिचाऱ्या चिकित्सक जिज्ञासूंना 'मानता की नाही, की दाखवू कांट' अशी सरळ दमदाटी झाली).

पाटणकरांच्या अशा त्रोटक व वाचकाला गोंधळात टाकणाऱ्या स्वतःच्या भूमिकेच्या मांडणीनंतर त्यांनी लिहिलेला लेखाचा ऐंशी टक्के उरलेला भाग, 'हा लेख असे लेख कसे नसावेत याचा वस्तुपाठ आहे' हे विधान अधिकच सिद्ध करणारे आहे.

अनुक्रमणिका






आपली भूमिका काय आहे हे 'अ' मध्ये थोडक्यात सांगण्याचा प्रयत्न केल्यानंतर पाटणकर 'आ' करतात आणि उगाचच बिचाऱ्या डॉ. रा. शं. वाळिंबेंना खर्ची घालतात. औचित्यविचारही ( औचित्य : व्युत्पत्ति, क्षेमेन्द्र व सामान्य जन या सर्वांच्या अर्थाने) बाजूला टाकतात. डॉ. वाळिंबे यांची बासलात ते चार-दोन वाक्यांत लावतात. 'प्रा. रा. शं. वाळिंबे यांच्या वाङ्मयीन टीका : शास्त्र आणि पद्धती (पुणे, १९४६) या पुस्तकात आपल्या प्रश्नांची उत्तरे मिळणार नाहीत हे या विषयात गती असलेल्या कोणालाही चटकन ध्यानात येईल...चांगली, व्यवस्थित सैद्धान्तिक चिकित्सा व चर्चा यांपैकी काहीही प्रस्तुत पुस्तकात नाही.'

मग या पुस्तकाचा निर्देश कशासाठी ? पाटणकर लिहितात : 'पण त्यात बऱ्याच समीक्षकांची नावे मिळतात, व त्यांच्या साहाय्याने आपल्याला स्वतंत्रपणे प्रयत्न करून इंग्रजी समीक्षेच्या विशिष्ट कालखंडातील एक उपयुक्त आराखडा तयार करता येतो.' असा आराखडा तयार करण्यासाठी पाटणकर यांना डॉ. वाळिंबेंची स्मरणकाठी हाती घ्यावी लागते– आणि तीदेखील १९४६ मध्ये प्रसिद्ध झालेल्या पुस्तकाची– हे धक्कादायक आहे. या स्मरणकाठीच्या आधाराने थोडा अलीकडे पलीकडे फरक करीत ते आपला प्रवास त्या 'विशिष्ट कालखंडा'तच करीत राहतात व झटक्यात पुढे सरकत नाहीत हे त्याहून धक्कादायक आहे.

पाटणकरांच्या लेखाची यापुढील जवळजवळ सर्व पाने निम्मीअधिक डॉ. वाळिंबे यांनी निर्देश केलेल्या लेखकांच्या मूळ इंग्रजीत दिलेल्या इंग्रजी उताऱ्यांनी भरलेली आहेत. या अशा भाषांतररहित केलेल्या मांडणीलादेखील माझा आक्षेप आहे. व्यावहारिक आणि तात्त्विकही. व्यावहारिक अशासाठी की त्यामुळे लेखन चिकित्सक जिज्ञासू अशाही मराठी वाचकांच्या आकलनापलीकडे जाते. तात्त्विक अशासाठी की मूलभूत काही मांडणी इंग्रजी उताऱ्यांच्याच आधारे करावयाची असेल तर ती इंग्रजीतच एखाद्या दर्जेदार नियतकालिकातून करणे उचित होईल. 'नवभारत' सारख्या मासिकात मग त्या लेखाचा नुसता संदर्भ-निर्देशही त्या कुवतीच्या वाचकाच्या दृष्टीने पुरेसा होईल.

दुसरा तात्त्विक आक्षेप पाटणकरांच्याच या लेखातील एक अवतरण देऊन पुढे सरकवता येईल. डॉ. वाळिंबे यांच्या संदर्भात ते लिहितात (पृ. ७) : 'पुस्तकातील पानापानांवर अनेक ग्रंथांची / ग्रंथकारांची नावे पेरल्यानंतर शेवटी जेमतेम एक पान भरेल एवढीच 'आधारभूत ग्रंथांची यादी देणे ही मदत पुरेशी नाही.' पाटणकरांचे हे विधान त्यांनाच मान्य असेल तर अनेक पाने इंग्रजी अवतरणे देऊन कोठे त्यांचा पानभरही आशय मराठीत न सांगणे ही वाचकाला केलेली कोणत्या प्रकारची मदत आहे ?

तिसरा तात्त्विक भाग असा आहे की ज्या अवतरणांच्या आधारे आपण मांडणी करत असतो त्यांच्या मूळ लेखकानेच आपली भूमिका अन्यत्र केव्हा बदललेली नाही याचीही ग्वाही अवतरण उद्धृत करणाऱ्याला देता आली पाहिजे.

मूळ आशयाचे आपल्याला झालेले आकलन हे अंतिम व संपूर्ण आहे असा आत्मविश्वास अनाठायी असण्याची शक्यता ही या तात्त्विकतेतील चौथी अडचण आहे, हे अनेकदा घडू शकते. तत्त्वचिंतकाला आपल्यावरील टीकेला आपल्याच हयातीत उत्तर देता यावे या हेतूने Library of Living Philosophers मधील ग्रंथांची रचना करण्यात आली. त्या तत्त्वचिंतकावरील आपली टीका इतर विद्वानांनी मांडावी व त्या तत्त्वचिंतकाने आपले त्या टीकेला उत्तर द्यावे अशी ही रचना आहे.

या ग्रंथमालेत बर्ट्रांड रसेलच्या तत्त्वज्ञानावरचा एक ग्रंथ आहे. त्या ग्रंथांत रसेल आपल्या प्रास्ताविकात म्हणतो : 'मला काय म्हणावयाचे आहे हेच यांपैकी अनेकांना उमगलेले नाही. आजवर तर मी किती सुगम पारदर्शक शैलीत लिहितो असा मला एक अभिमानच होता.'

विद्वत्तेच्या क्षेत्रात यासारख्या तात्त्विक आपत्तीतून सुटका नाही हे मला मान्य आहे. परंतु हे अवधान असले तर वादात अकारण आपला आवाज फार वर जात नाही.

पाटणकरांच्या लेखातील विद्वत्तेच्या या गंगावतरणातून बाहेर आपल्याला पेलेल अशा सपाट प्रदेशात आल्याचे समाधान, ते रेमंडच्या Through Literature to Life पर्यंत येऊन पोहोचतात तेव्हा मिळते. आधीची अनेक अवतरणे शास्त्रीय विवेचनाची, मराठीत भाषांतर करावयास क्लिष्ट, संकल्पना स्पष्ट करावयाच्या तर सविस्तर विवेचनाची गरज असणारी, अशी असल्यामुळे भाषांतरे दिली नाहीत असा दावा

असेल तर रेमंडच्या उताऱ्याबाबत तर ही अडचण मुळीच नव्हती, की, इतर प्रवाह पार करणाऱ्या वाचकाला येथे मदतीची आवश्यकताच नसणार अशी पाटणकरांनी आपली समजूत करून घेतली ? तसे असल्यास ती समजूत चुकीची नसली तरी या उणिवेचे परिमार्जन करणारी मात्र नाही.

रेमंडच्या पुस्तकाविषयी व त्याच्या पद्धतीविषयी माझ्या मनात गेले अर्धशतक अखंड उत्साह आहे. अजून बालबुद्धीतच वावरत असल्याचे हे लक्षण असू शकेल असे कोणी म्हटले तर मला ते नाकारता येणार नाही. फार फार तर पाटणकर म्हणतात तशी : ' मात्र चिकित्सक बुद्धीच्या माणसाने डोळ्यांवर मुद्दाम झापडे लावली तरच त्याच्यावर या पद्धतीचा परिणाम घडू शकेल. ' एवढीच सवड मला घेता येईल आणि ती तशी घेतली की, ' फक्त असा माणूसच संमोहनविद्येच्या आहारी जाऊ शकतो ' हा त्यांचा त्यापुढील शेराही स्वीकारावा लागेल.

एवढे लिहिल्यानंतर माझ्या या संदर्भातील भूमिकेविषयी काहीच न लिहिणे उचित होणार नाही. ती भूमिका अशी :

१ ) आस्वादक समीक्षा तर-तम प्रतवारी दाखविते, रस-विरस, घृणा आदी सर्व स्पष्ट करते.

२ ) आस्वादक समीक्षेचा खरा अधिकार मूळ लेखकाइतक्याच कसाच्या व प्रतिभेच्या लेखकालाच असतो. व्यवहारात हे दुष्कर असते. म्हणून आपल्याला व्यावसायिक कारागीर समीक्षकावर आपली गुजराण करावी लागते. परंतु त्यांनी या प्रान्तात अभिमानाची सर्व वस्त्रे उतरून ' विनीतवेषेण ' प्रवेश करणे हेच त्यांच्या व इतरांच्याही हिताचे.

३ ) भवभूतीने आपली अवज्ञा करणाऱ्या लोकांना उद्देशून काढलेला उद्गार अशा व्यावसायिक टीकाकाराविषयी असावा. ' समानधर्मा ', ' माझीया जातीचे मज भेटो कोणी ' यामागील कलावन्ताच्या मनातील व्याकुळता वेगळ्या स्तरावरची असते.

४ ) लोकोत्तराणां चेतांसि कोऽपि विज्ञातुमर्हति । हा भवभूतीचा उद्गार या संदर्भात अधिक चपखल आहे. ' गुणी गुणं वेत्ति ' तसे लोकोत्तर प्रतिभेचे आकलन एखादा लोकोत्तर प्रतिभावानच करू शकतो. पण यासाठी युगानुयुगे वाट पाहावयाची का ? कालिदास गटेपर्यंत कसा आणि कधी जाऊन पोचणार ?

५ ) परंतु तरीही अशा आस्वादक प्रतिभाशील समीक्षेचे आता सहज सुचणारे एक उदाहरण देता येण्यासारखे आहे.

ज्ञानेश्वर लोकोत्तर होते. ज्ञानेश्वरी ही लोकोत्तराची साहित्यकृती आहे. ज्ञानेश्वरांनी प्रत्यक्ष जीवनात जे दुःख सोसले त्यातील कडवटपणाची पुसटशीदेखील छाया ज्ञानेश्वरीत कोठेही नाही हे सामान्य रसिकांनाही माहीत आहे.

एकदाच एक विशेषण येते : ' आणि उन्मत्ते जगें '.

यावर विनोबाजींचे समीक्षण असे :

' येथे उन्मत्त हा शब्द अधिक्षेप म्हणून वापरलेला नाही. अुन्मत्त असणे हा जगाचा सहजधर्म आहे : जसा चंचल असणे हा सागराचा स्वभावधर्म आहे.'

ही अेका लोकोत्तराने दुसऱ्या लोकोत्तराच्या लोकोत्तर साहित्यकृतीची केलेली त्याच स्तरावरील आस्वादक समीक्षा.

ही केवळ अेक झलक.

अर्थात ही भूमिका १९४६ च्या आधीच्या व नंतरच्याही अनेक इंग्रजी समीक्षकांनी केव्हाच अुखडून टाकलेली असणार याविषयी माझ्या मनात शंका नाही.

**— देवदत्त दाभोलकर**

मा. संपादक नवभारत यांस,
स. न. वि. वि.

मार्च १९९० च्या ' नवभारत 'च्या अंकात 'आस्वादक समीक्षा— एक चकवा ' हा माझा लेख आलेला आहे. त्यावर प्रा. देवदत्त दाभोलकर यांनी ' समीक्षेची समीक्षा— अनेक चकवे ' या शीर्षकाखाली त्यांची प्रतिक्रिया दिलेली आहे. त्यांनी काढलेला निष्कर्ष असा : ' असा लेख कसा नसावा याचा हा लेख म्हणजे एक वस्तुपाठच आहे.' ' असा ' म्हणजे ' समीक्षाविषयक तात्त्विक ' लेख हे दाभोलकरांना अभिप्रेत असावे, असे धरून चालायला हरकत नाही. त्यांनी स्वतः ' असा ' म्हणजे ' कसा ' हे स्पष्ट केलेले नसल्याने त्याविषयी वाचकालाच तर्क करावे लागतात.

दाभोलकरांनी सुरुवातीला आपण कोणत्या भूमिकेतून लिहीत आहोत हे सांगितले आहे. ते म्हणतात, ' माझी भूमिका केवळ चिकित्सक (हेही कोणी मानले नाही तरी माझी हरकत नाही) जिज्ञासूची आहे.'

याच्या आधीच्या परिच्छेदात पुढील विधान आलेले आहे. 'माझी या क्षेत्रातील भूमिका पूर्णपणे ज्ञान-निरपेक्ष असल्यामुळे मूल्यमापन किंवा मानापमान-मापन करण्याचा माझा अधिकार नाही.' हे विधान संदिग्ध आहे कारण 'हे क्षेत्र' म्हणजे 'साहित्यसमीक्षेचे एकूण क्षेत्र' की 'सारंगांच्या विधानाने सीमित केलेले क्षेत्र' असा घ्यायचा हे स्पष्ट होत नाही. लेखात सर्व ठिकाणी मिळणारे पुरावे पाहता पहिला अर्थ बरोबर असावा असा कयास करता येतो.

दाभोलकर लिहितात : 'पहिला प्रश्न असा की हा लेख कोणी कोणासाठी लिहिला आहे ?... सामान्यतः विद्वानाने चिकित्सक जिज्ञासूंसाठी लिहिलेला लेख अशी भूमिका लेखकाच्या व संपादकांच्याही मनात असावी असे वाटते. 'नवभारत'च्या व्यासपीठावर ती योग्यही आहे; परंतु पाटणकरांच्या मांडणीत मात्र या सर्व स्तरांची गल्लत झाल्यासारखी दिसते.'

आपण प्रस्तुत लेखाचे जे मूल्यन केले आहे त्याच्या पुष्टचर्थ कारणे देण्याचे दाभोलकरांनी कबूल केले आहे याचीसुद्धा नोंद येथे करायला हवी.

दाभोलकरांची प्रतिक्रिया वाचताना आपण काही प्रश्न मनात बाळगायला हवेत : १) त्यांची भूमिका 'चिकित्सक जिज्ञासू'ची आहे याचे पुरावे त्यांच्या लेखात मिळतात का ? २) 'नवभारत' मासिकात कशा प्रकारचे लेखन यावे याबद्दलची त्यांची अपेक्षा / कल्पना वस्तुस्थितीनिदर्शक व योग्य आहे का ? ३) माझ्या मूळ लेखाचे मूल्यन करताना त्यांनी खरोखरच कारणे (reasons) दिली आहेत का ? की त्यांनी इतरही काही (किंबहुना इतरच काही) केले आहे ? ४) त्यांच्या लेखनपद्धतीत लक्षात घेण्यासारखे काही विशेष आहेत का ? बौद्धिक वादाला ते पोषक आहेत का ?

वरीलपैकी दुसऱ्या मुद्द्यापासून मी प्रारंभ करतो. मी 'नवभारत'च्या वाचकांकरता लिहितो. महत्त्वाच्या विषयावरील गंभीर चर्चेसाठी 'नवभारत' हे मराठीतील एक सर्वांना खुले असे दालन आहे. त्याला एखाद्या विषयातील technical research journal म्हणता येणार नाही हे खरे. पण त्यामुळे ते दर्जेदार नाही असे ठरत नाही. ते 'चांदोबा', 'रीडर्स डायजेस्ट' या पातळीवरचे मासिक नाही हे कोणीही मान्य करील. या दोन मासिकांपेक्षा बऱ्याच वरच्या दर्जाचे, जेथे विद्वत्तापूर्ण लिखाण शोभून दिसते, चांगल्या युक्तिवादांचे, चोख पुराव्यांचे जेथे स्वागत होते अशा प्रकारचे ते मासिक आहे. त्याच्या वाचकांपैकी बरेचजण 'जिज्ञासू' आहेत, जाणण्याची, ज्ञान मिळविण्याची इच्छा मनात बाळगणारे आहेत असा माझा समज आहे. एखादा लेख कठीण आहे असे वाटल्यास तो कळण्यासाठी आवश्यक असलेली पूर्वतयारी ते करतील अशी अपेक्षा करणे योग्य ठरावे. ते जरी एक जर्नल ऑफ आयडियाज असले तरी त्याचे टेक्निकल रिसर्च जर्नलशी असलेले नाते, 'रीडर्स डायजेस्ट'पेक्षा जास्त जवळचे आहे, व असायला हवे. दाभोलकरांची 'नवभारत' सारख्या मासिकाचे स्वरूप व कार्य याबद्दलची कल्पना बरीच वेगळी असावी. जे सर्वसामान्य वाचकाला वाचल्याबरोबर, विनासायास कळेल असे लेखन 'नवभारत'सारख्या मासिकातूनही यावे अशी त्यांची अपेक्षा असावी. प्रथमदर्शनी तरी त्यांची भूमिका लोकशाहीवादी वाटते; तळागळाच्या सामान्य लोकांचे ते प्रतिनिधित्व करीत आहेत, सर्व प्रकारचे ज्ञान सर्वांना उपलब्ध व्हावे या मताचा पुरस्कार करीत आहेत असा एखाद्याचा समज होईल. पण जरा विचार केल्यास हा समज चुकीचा आहे असे वाचकाच्या लक्षात येईल. लोकशिक्षण व लोकरंजन यांमध्ये फरक आहे, व तो नेहमी कटाक्षाने केला पाहिजे. जे विनासायास मिळते त्यातून लोकरंजन होईल, पण लोकशिक्षण होणे कठीण आहे. ज्ञानाच्या क्षेत्रात सर्वांना समान संधी मिळायला हवी. पण याचा अर्थ एकूण लोकसंख्येच्या बौद्धिक ल. सा. वि. ला साध्य केंद्रबिंदू मानायला हवे असा होत नाही. या क्षेत्रात प्रगती करायची असेल, जास्त जास्त वरच्या श्रेणीपर्यंत पोचायचे असेल तर अभ्यास, चिकाटी, परिश्रम, स्वतःच्या हिंमतीवर केलेला व्यासंग यांवर भर देणे अत्यावश्यक आहे. देवाने दिलेल्या बुद्धीच्या जोडीला वरील गोष्टी असल्या तरच प्रगतीची शाश्वती देता येईल.

स्वतः दाभोलकर लोकशाहीवादी असतीलही, पण त्यांची या लेखातील भूमिका ही ज्ञानाच्या क्षेत्रात लोकहितकारी नसून तिच्या विरोधी असल्याचे दिसते. शिक्षकाने आपल्या विषयाचा जो भाग वर्गात शिकविला त्याची उजळणी विद्यार्थ्याने घरी करावी, विषयाबद्दल ज्या ज्या गोष्टींचा निर्देश शिक्षकाने केला असेल त्या गोष्टींचा मागोवा घ्यावा, या सर्वांवर

मनन, चिंतन करावे, ज्या शंका निर्माण होतील त्या पुढच्या तासाला शिक्षकास विचाराव्या अशी अपेक्षा असते, आणि ती रास्तच आहे. एखाद्या विद्यार्थ्याने वर्गात उशिरा प्रवेश घेतला असेल तर त्याने 'घरचा अभ्यास' जास्त कसोशीने करायला हवा अशीही अपेक्षा करणे हेसुद्धा रास्त आहे. जर एखादा विद्यार्थी आज या विषयाच्या तासाला, उद्या त्या विषयाच्या, परवा आणखी एका विषयाच्या तासाला जाऊन बसला तर तो कशातही लक्ष नसलेला, टिवल्याभावल्या करणारा उडाणटप्पू ठरेल; त्याला कोणी अनेकलक्ष्यी, चौकसबुद्धीचा विद्यार्थी म्हणणार नाही. वायफळ चौकशा करणाऱ्याला जिज्ञासू म्हणणे म्हणजे संज्ञांबद्दल मोठाच गोंधळ करणे होय.

माझ्या लेखाच्या पहिल्या दोन परिच्छेदांत पुढील मजकूर आढळेल, "आस्वादक समीक्षा" या नावाने जे लेखन गेली बरीच वर्षे मराठीत ओळखले जाते आहे... त्याबद्दलची **माझी भूमिका मी याआधी स्पष्ट केलेली** आहे. व्यवस्थित युक्तिवाद व समर्पक उदाहरणे देऊन तिचा प्रतिवाद कोणी केल्याचे माझ्या पाहण्यात अजून आलेले नाही... मी व माझ्याशी सहमत असलेले समीक्षक ज्या प्रकारचे लेखन करीत आहोत त्याचे स्वरूप स्पष्ट व्हावे व त्याविषयीचे गैरसमज दूर व्हावेत या हेतूने प्रस्तुत लेख लिहिला आहे. त्याच्या पहिल्या भागात माझी तात्त्विक भूमिका **पुन्हा एकदा थोडक्यात** मांडली आहे.' (येथील अधोरेखन माझे) माझ्या मांडणीविषयी दाभोलकर लिहितात, 'या विषयाच्या संदर्भात ही मांडणी नीटपणे येणे हे अत्यंत महत्त्वाचे होते (चिकित्सक जिज्ञासूला तेवढे ज्ञान असावयासच हवे अशी भूमिकाच घ्यावयाची असल्यास अर्थातच गोष्ट वेगळी).' याच्या थोडे आधी दाभोलकरांनी स्वतःबद्दल पुढील माहिती दिली आहे : 'अन्य क्षेत्रांत काही गती असणाऱ्या, व याही क्षेत्रात चिकित्सक जिज्ञासा असणाऱ्या माझ्यासारख्या ...' इत्यादी. दाभोलकरांना दुसऱ्या कोणत्या तरी क्षेत्रात गती आहे या त्यांच्या दाव्याशी आपल्याला प्रस्तुत संदर्भात काहीही कर्तव्य नाही. त्यांना 'याही क्षेत्रात चिकित्सक जिज्ञासा आहे' हा त्यांचा दावा मात्र महत्त्वाचा आहे. त्याच्या पुष्टयर्थ दाखविता येईल असा पुरावा या लेखात मिळणे आवश्यक होते. पण तो मिळत नाही ही वस्तुस्थिती आहे. माझी भूमिका मी अनेक वर्षे मांडतो आहे. **मी ती अन्यत्र विस्ताराने**. मांडली असून प्रस्तुत लेखात ती पुन्हा एकदा थोडक्यात दिली असल्याचा खुलासा केलेला आहे. जर दाभोलकर खरेच जिज्ञासू असते तर त्यांनी माझे प्रस्तुत संदर्भातील इतर लेखन वाचले असते, व मगच ते वादाला उभे राहिले असते. पण ते ज्याला जिज्ञासा म्हणतात ती रस्त्यावर गर्दी पाहिल्यावर 'काय झाले हो ?' असे विचारणाऱ्या, व तत्संबंधी वरवरच्या चौकशा करणाऱ्याच्या सहजप्रवृत्तीपेक्षा वेगळी वाटत नाही. माझ्याशी सहमत असलेल्या समीक्षकांची नावे त्यांनी विचारली आहेत. समजा, त्यांना ती कोणी सांगितली तर दाभोलकर काय करणार आहेत ? ते त्यांचे लेखन वाचतील असे वाटत नाही; गंभीरपणे काही तरी वाचणे, अभ्यास करणे ही त्यांची रीत असती तर माझे लिखाण त्यांनी वाचले असते. ती त्यांची रीत नसल्याने त्यांनी ही नावे संग्रही ठेवून पुढे केव्हा तरी आपल्या पद्धतीने, जाता जाता वापरली असती; इतकाच त्यांच्या 'जिज्ञासे'चा अर्थ होऊ शकतो.

आता 'आस्वाद', 'रस', 'कांट' यांच्या मी केलेल्या उपयोगाविषयी थोडेसे. मी या तिन्ही विषयांवर सविस्तर लेखन केले आहे. दाभोलकर ते वाचतील अशी आशा करणे व्यर्थ आहे. खऱ्या जिज्ञासूंनी ते वाचावे व त्याची दाभोलकरांच्या या विषयावरील प्रस्तुत लेखातील परिच्छेदाची तुलना करावी व त्यांच्यातील खोल-उथळ-बद्दलचा निर्णय घ्यावा. 'नवभारत'च्या 'जिज्ञासू' वाचकांचे कांटकडे लक्ष वेधण्यात अवैध किंवा अयोग्य काय आहे ? माझ्याप्रमाणे या विषयाच्या इतरही अभ्यासकांना कांट परिचित आहे. कांटबद्दलचे माझे बरेच लेख खुद्द 'नवभारत'मध्ये आले आहेत. कांटचा उल्लेख त्यांना ('नवभारत'च्या वाचकांना) दमदाटीसारखा वाटणार नाही असा विश्वास वाटतो.

पुढे दाभोलकर लिहितात, 'आपली भूमिका काय आहे हे 'अ'मध्ये थोडक्यात सांगण्याचा प्रयत्न केल्यानंतर पाटणकर 'आ' करतात आणि उगाचच बिचाऱ्या डॉ. रा. शं. वाळिंबेंना खर्ची घालतात. औचित्यविचारही ...बाजूला टाकतात. डॉ. वाळिंबे यांची वासलात ते चार-दोन वाक्यांत लावतात.' माझ्या लेखात वाळिंबे यांची गंभीर दखल घेणे दोन कारणांमुळे आवश्यक होते : १) एक विद्वान समीक्षक म्हणून त्यांचा त्या काळात (आणि कदाचित आजही) असलेला दबदबा. २) **वाङ्मयीन टीका : शास्त्र आणि पद्धती** या

पुस्तकाचा बरीच वर्षे पाठ्यपुस्तक / संदर्भपुस्तक म्हणून झालेला वापर. अनेक मराठी वाचक व परीक्षार्थी आजही जेवढे मराठीत उपलब्ध आहे त्याच्या पलीकडे सहसा जात नाहीत. अशा परिस्थितीत ज्यांना इंग्रजी व मराठी या दोन्ही भाषा येतात त्यांच्यावर एक महत्त्वाची जबाबदारी पडते; जे इंग्रजीत आहे ते चोखपणे मराठीत आणणे. हे काम नुसत्या गोलमोल तर्जुम्याने, किंवा चांगल्या भाषांतरानेही साधणारे नाही. इंग्रजीतील संकल्पनाव्यूह मराठीत विशद करायला हवा, त्याची चिकित्सा करायला हवी. मुख्य म्हणजे या सर्व गोष्टी चोखपणे व पूर्ण बौद्धिक तयारीने व्हायला हव्यात. अनेक परीक्षार्थी वाळिंबे यांच्या प्रस्तुत पुस्तकावर इंग्रजीतील टीकापद्धतींबद्दलच्या माहितीसाठी अवलंबून राहिले असणार, यात शंका नाही. आपल्याकडे विशिष्ट प्रकारची साहित्यसमीक्षापद्धती केव्हा निर्माण झाली असावी याचा शोध घेणे हा माझा प्रस्तुत लेखात उद्देश होता. वाळिंबे यांच्या पुस्तकामार्फत इकडे आलेल्या काही इंग्रजी समीक्षकांचा या निर्माण होण्याशी काही संबंध असेल का हा प्रश्न मनात येणे स्वाभाविकच होते. प्लेटोपासून आजपर्यंतच्या टीका-शास्त्राचा इतिहास मला लिहायचा असता तर मी वाळिंबे यांच्या वरील पुस्तकाचा दाभोलकर म्हणतात त्याप्रमाणे स्मरणकाठी म्हणून उपयोग केला नसता. माझे लेखन ज्यांनी वाचले आहे त्यांच्यापैकी कोणीही हे सांगेल. ते ज्यांनी वाचलेले नाही अशा दाभोलकरांसारख्याबद्दल मला अर्थात काहीच म्हणायचे नाही. जाता जाता दाभोलकरांना एक विनंती अशी की त्यांनी 'पाटणकर "आ" करतात'सारख्या पोरकट कोटयांचा मोह टाळण्याचा जमेल तितक्या नेटाने प्रयत्न करावा.

भाषांतररहित इंग्रजी अवतरणे दिल्याबद्दल दाभोलकरांनी माझ्यावर टीका केली आहे. वाळिंबे यांनी आपले काम चोखपणे केले आहे की नाही हे ठरविण्यासाठी वाचकांनी प्रस्तुत अवतरणे मूळ इंग्रजी-तूनच वाचावीत असा माझा आग्रह होता व आजही आहे. ज्यांना इंग्रजी अजिबात येत नाही त्यांची यामुळे गैरसोय झाली असणार हे खरे. पण 'नवभारत'च्या अनेक वाचकांना, वाळिंबे व दाभोलकर यांच्याप्रमाणेच, इंग्रजी वाचता येते. त्यांच्याबाबत खरा प्रश्न भाषेचा नाहीच. तो आहे आकलनशक्तीचा आणि सच्चे-पणाचा. वाळिंबे यांच्यात हे गुण असल्याचे या पुस्तकात दिसते का? ज्या ग्रंथांच्या आधारे वाळिंबे लिहितात ते त्यांनी मुळातून वाचले आहेत का? ते तसे वाचले असतील तर त्यांना ते कळले आहेत का? ते त्यांनी मराठी वाचकांसाठी व्यवस्थितपणे मांडून विशद केले आहेत का? या तिन्ही प्रश्नांना नकारार्थी उत्तरे द्यावी लागतील अशी परिस्थिती आहे. पुस्तकात निर्देशिलेले लेखक व त्यांच्या म्हणण्याचा वाळिंबे यांनी केलेला विपर्यास याचा साक्षात प्रत्यय यायचा असेल तर दोन्ही ठिकाणचा मजकूर मुळातून वाचल्याखेरीज गत्यंतर नाही.

माझ्यावर दाभोलकरांनी घेतलेल्या तिसऱ्या व चौथ्या तात्त्विक आक्षेपांचे नक्की प्रयोजन काय हे कळत नाही, मी दिलेले उतारे मूळ लेखकांच्या प्रातिनिधिक लेखनांतून घेतलेले आहेत. अशा परिस्थितीत या लेखकांनी आपली भूमिका अन्यत्र बदलली असेल तर ते दाखविण्याची जबाबदारी माझ्यावर आक्षेप घेणाऱ्यावर येऊन पडते. समजा, दाभोलकरांना हवी असलेली ग्वाही मी दिली, तर दाभोलकर या ग्रंथकारांचे सर्व लिखाण वाचून माझा दावा खरा आहे का हे स्वतः तपासणार आहेत का? त्यांची जिज्ञासा रस्त्यावर गर्दी पाहिल्यावर 'काय झाले हो?' हे विचारण्या-पलीकडे जात नसल्याने, ते यांपैकी काहीही करणार नाहीत याची ग्वाही मात्र कोणीही देऊ शकेल. 'मूळ आशयाचे आपल्याला झालेले आकलन हे अंतिम व संपूर्ण आहे असा आत्मविश्वास अनाठायी असण्याची शक्यता' असते असे ते मला बजावतात. मूळ मजकुराचे मी लावलेले अर्थ जगावेगळे नाहीत. ते तसे असते व मी त्यांबद्दल ग्वाही दिली असती, तरच ते सिद्ध करण्याची जबाबदारी माझ्यावर येते. सर्व वेळा ती येते असे मानणे म्हणजे केवळ तार्किक शक्यतेला वास्तव जगातल्या शक्यतेइतके महत्त्व देणे होय. तसे जर केले तर आपले नित्याचे सर्व व्यवहार बंद पडतील.

जर वाळिंबे यांनी सर्व बाबतींत वर दाखविलेला ढिसाळपणा केला असेल तर दाभोलकर त्यांना 'बिचारे' का म्हणतात? मी त्यांच्या चुका दाखविणे हे 'उगाचच' केलेले कृत्य कसे ठरते? त्यात औचित्यभंग कोठे होतो?

माझी पुढील वाक्ये दाभोलकरांनी उद्धृत केली आहेत : 'एकूण इंग्रजी साहित्याचा येथील लेखक-

वाचकांवर मोठा परिणाम झालेला आहे. अनेक इंग्रजी लेखकांकडे, साहित्यकृतींकडे, साहित्यप्रकार व लेखन-पद्धती यांच्याकडे आपण अनुकरणयोग्य मॉडेल्स म्हणून पाहात आलेले आहोत. म्हणूनच इंग्रजी समीक्षकांबद्दल विचार करणे आपल्या विषयाच्या संदर्भात प्रस्तुत ठरेल असे वाटते.' यावर दाभोलकर म्हणतात, 'पाटणकरांचे हे वाटणे पूर्णपणे चुकीचे आहे.' आपण कोठेही सापडू नये म्हणून संदिग्धतेच्या, मोघमपणाच्या धूसर चोर-वाटा, पळवाटा यांचा आश्रय घेण्याचा सावधपणा दाखविणारे दाभोलकर वरील वाक्यात ज्या अर्थी ठाम-पणे विधान करतात त्या अर्थी त्यांच्याजवळ माझ्या चुकीबद्दल ठोस व निरुत्तर करणारा पुरावा असणार असा साहजिकच समज होतो. पण ठोस पुराव्याऐवजी पुढील मजकूर दाभोलकरांकडून मिळतो : 'इंग्रजीत आदराने अनुवाद केला जावा असे संस्कृत भाषेतील साहित्यटीकाकार पाटणकर यांना माहीत आहेत. मराठीत त्या तोलामोलाचे नसले तरी ज्यांचे काही विचार तरी एखाद्या जागतिक मान्यता असलेल्या भाषेतून जगापुढे येणे आवश्यक आहे असे वाटावे अशा तोलाचे काहीच लेखन कोणी केले नाही काय? असल्यास ते कोणते? त्याचे या विषयाच्या संदर्भात महत्त्व कोणते? ...' ठामपणे मला चूक म्हणायचे व ते सिद्ध करण्या-साठी लागणारा पुरावा स्वतः न देता, माझ्याकडेच मागायचा ही वादाची न्यारी रीत झाली. त्यांनी वर विचारलेल्या प्रश्नांचा तोंडवळा इंग्रजीत ज्याला 'ऱ्हेटरिकल क्वेश्चन' म्हणतात त्याच्यासारखा आहे. H. W. Fowler च्या A Dictionary of Modern English Usage ( Oxford, 1926 ) मध्ये 'ऱ्हेटरिकल क्वेश्चन'चे स्पष्टीकरण पुढील-प्रमाणे दिले आहे : A question is often put not to elicit information, but as a more striking substitute for a statement of contrary effect. The assumption is that only one answer is possible, & that if the hearer is compelled to make it mentally himself it will impress him more than the speaker's statement. So *Who does not know ...?* for *Everyone knows, Was ever such nonsense written ...?* for *Never was & c.*' ( p. 616 ). दाभोल-करांनी विचारलेले प्रश्न 'ऱ्हेटरिकल प्रश्न' असतील, तर त्यांची उत्तरे त्यांनीच दिल्यास सर्वांचेच श्रम वाचतील; ती त्यांनी पटकन देऊन टाकावीत. त्यामुळे वाद तरी लौकर पुढे सरकेल. पण त्यांचा तोंडवळा कसाही असला तरी त्यांनी विचारलेले प्रश्न 'ऱ्हेटरिकल' नाहीत. त्यांची उत्तरे प्रयासानेच शोधून काढावी लाग-तील. त्यासाठी काम करावे लागेल. अशा परिस्थितीत ते काम त्यांनी इतरांवर सोपवावे हे स्वाभाविक नाही का? वरील प्रश्नांची उत्तरे सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहेत, मराठीचे द्वेष्टे पाटणकर ती मुद्दाम दडवून ठेवीत आहेत, असे सुचवायचे; (असे केल्याने मराठी वाचक आपल्या बाजूकडे वश होईल अशी दाभोल-करांची समजूत असावी)'; उत्तरे शोधून काढायची आहेत असे ठरले तर पाटणकरांचे 'हे वाटणे पूर्णपणे चूक आहे' असे ठासून म्हणणाऱ्या दाभोलकरांनी हे काम स्वतः न करता पाटणकरांनी किंवा इतर कोणी तरी ते केले पाहिजे अशी अपेक्षा करायची ही एक भाषा-चलाखी ठरते. भाषा-चलाखीने बेसावध लोकां-बरोबर केलेले वाद कदाचित जिंकता येतील; पण सत्यसंशोधनाच्या कामी कोणतीच चलाखी उपयोगी पडत नसते. उपहास, चेष्टा, आयरनी, वक्तृत्व, ही सर्व दाभोलकरांची आयुधे चलाखीचीच रूपे आहेत.

आपल्या प्रतिक्रियात्मक लेखाच्या शेवटी दाभोल-करांनी कसलाही युक्तिवाद न करता आपली आस्वादक समीक्षेविषयीची भूमिका जेमतेम एक पान भरेल इतक्या जागेत दिली आहे. ती नवीही नाही आणि समाधान-कारकही नाही. या मजकुराचे कोण काय करणार? त्यांच्या भूमिकेवर या ना त्या प्रकारची चर्चा याआधी झालेली आहे. तिच्या पार्श्वभूमीवर त्यांनी आपली भूमिका मांडली असती तर मात्र गोष्ट वेगळी होती.

दाभोलकर स्वतःला 'चिकित्सक जिज्ञासू' म्हणव-तात. पण जो लेखक स्वतः कसलाच अभ्यास करायला तयार नाही त्याला 'जिज्ञासू' कसे म्हणायचे? आणि जो सत्यसंशोधनाचे वैध मार्ग सोडून चलाखीच्या विविध प्रकारांचा अवलंब करतो त्याला 'चिकित्सक' कसे म्हणायचे?

दाभोलकरांची प्रतिक्रिया वाचून मला थोडेसेही आश्चर्य वाटले नाही. स्वतः काहीही न करता इतरांना कार्यप्रवण करणारे आदेश त्यांनी याआधीही दिले आहेत. काही वर्षांपूर्वी 'नवभारत' मासिकात रेगे-

लवंदे वाद झाला होता हे वाचकांना स्मरत असेल. ' निकाली कुस्ती झालीच पाहिजे ' असा आदेश देऊन दाभोलकरांनी हा वाद घडवून आणला होता असे म्हणणे समर्पक ठरेल. कारण त्या वेळी बौद्धिक क्षेत्रातील मराठी अस्मितेचा, तिच्या इभ्रतीचा प्रश्न त्यांना फार महत्त्वाचा वाटत होता. वादात मे. पुं. रेगे यांनी भरपूर तयारीसहित व विस्ताराने पूर्वपक्ष मांडला होता. पूर्वपक्षाला अजिबात स्पर्श न करता लवंदे यांनी त्रोटक व थातुरमातुर असे आपले उत्तर दिले होते. ज्यांनी ' झालीच पाहिजे ' अशी आरोळी ठोकून बौद्धिक द्वंद्व घडवून आणण्यात पुढाकार घेतला, व जे स्वतःला चिकित्सक, जिज्ञासू समजतात त्या दाभोलकरांनी पुढे आलेल्या युक्तिवाद, पुरावे इत्यादींची नीटपणे चिकित्सा करून कोणाची बाजू बरोबर आहे याविषयी स्वतःचा निर्णय जाहीर करणे जरूर होते. परंतु त्यांनी वरीलपैकी काहीही केले नाही. वादाच्या संदर्भात प्रस्तुत असलेल्या मुद्द्यांना स्पर्श न करता, त्यांची चिकित्सा न करता, वादविषयावर स्वतःहोऊन काहीही स्वतंत्र वाचन न करता लवंदे यांच्या पत्रा-इतकेच त्रोटक पत्र लिहून दाभोलकरांनी वादावर पडदा टाकला. आपण जरी नाही तरी इतरांनी चिकित्सक जिज्ञासू व्हावे, मराठी अस्मितेसाठी युयुत्सू बनावे या परोपकारी वृत्तीने दाभोलकरांनी वरील सर्व केले असेल तर त्यांना असे सांगण्याची वेळ आली आहे की आज निदान काही वाचक पुरेसे जागृत झालेले आहेत. 'एका वादाच्या निमित्ताने' नावाचा एक विस्तृत लेख काही वर्षांपूर्वी 'नवभारत' मासिकात आला होता हे ज्यांना आठवत असेल त्यांना हे म्हणणे पटेल. स्वतः काहीही न करता फक्त 'झालीच पाहिजे' म्हणून झुंज लावून देणाऱ्यांची गरज महाराष्ट्राला आज उरलेली नाही. 'झालीच पाहिजे' वाल्याकडे दुर्लक्ष करून इतरांनी आपापली विहित कामे करीत राहण्यात सर्वांचे हित आहे. निदान माझे धोरण मी असे ठरविले आहे.

**–रा. भा. पाटणकर**

मा. संपादक, नवभारत यांस

स. न. वि. वि.

'नवभारत'च्या एप्रिल १९९० च्या अंकात प्रा. सु. बा. कुलकर्णी यांनी 'ज्ञानेश्वरीचा लेखनकाल' या शीर्षकाचा एक लेख लिहून ज्ञानेश्वरीचा रूढ लेखनकाल म्हणजे शके १२१२ हा चुकीचा असल्याचे दाखविले. इतकेच नव्हे तर ज्ञानेश्वरीचा लेखनकाल नसला तरी ज्ञानेश्वरीच्या ( पहिल्या ? ) प्रतीचा लेखनकाल शके १२०८ असा असल्याचे प्रतिपादन करून शके १२०२ हा ज्ञानेश्वरांचा निर्वाणशक असल्याचा पुनरुच्चार केला आहे. त्यांची युक्तायुक्तता पाहणे, हा प्रस्तुतच्या छोटयाशा लेखाचा उद्देश !

हे दोनही काल ठरविताना त्यांनी विशिष्ट संख्यांचे निदर्शक असणाऱ्या विशिष्ट सांकेतिक शब्दांचा आधार घेतलेला आहे. उदाहरणार्थ, चंद्र म्हणजे एक नेत्र किंवा यम म्हणजे दोन, राम म्हणजे तीन, वेद म्हणजे चार, शर, किंवा प्राण म्हणजे पाच, अंग म्हणजे सहा, अद्री म्हणजे सात, निधी म्हणजे नऊ, रुद्र म्हणजे अकरा, सूर्य म्हणजे बारा इत्यादी. या पद्धतीने ज्ञानेश्वरी-प्रतलेखनाचा काल ठरविण्यासाठी त्यांनी ज्ञानेश्वरीच्या अठराव्या अध्यायातील १७८१ व्या ओवीचा आधार घेतलेला आहे. ती ओवी अशी :

" ऐसें युगीं वरि कळीं । आणि महाराष्ट्रमंडळी ।
श्रीगोदावरीचा कुळीं । दक्षिणिलीं ।। "

त्यांच्या म्हणण्याप्रमाणे 'ऐसें' हे 'ऐंशी' या अंकवाचक शब्दाचे सप्तम्यंत रूप आहे. हे त्यांचे मत स्वीकारणे कठीण होते, कारण 'ऐंशी' या ईकारान्त संख्यावाचकाचे सप्तम्यंत रूप एकारान्त होऊ शकते, हे दाखविण्यासाठी त्यांनी तत्कालीन मराठी भाषेतील तशाच प्रकारची इतर काही निःसंदिग्ध उदाहरणे देणे आवश्यक होते. जोपर्यंत अशी काही उदाहरणे पुढे येत नाहीत, तोपर्यंत ' ऐसें ' हे ' ऐंशी ' या संख्यावाचकाचे सप्तम्यंत रूप मानता येणार नाही. ' कळीं ' हे त्यांच्या मतानुसार ' कळा ' ( चंद्रकला ) या शब्दाचे सप्तम्यंत रूप कदाचित मानता येईलही, पण ' कळा ' (चंद्रकला) या शब्दाने सांकेतिक अर्थाचा बोध होतो, तो 'एक' या संख्येचा नाही, तर 'सोळा' या संख्येचा; कारण चंद्राच्या कलांची संख्या ' एक ' नसून ' सोळा ' आहे, हे प्रसिद्धच आहे. अशा स्थितीत त्यांनी म्हटल्याप्रमाणे ' ऐसें ' हे ' ऐंशी ' या संख्यावाचकाचे सप्तम्यंत रूप मानले तरी ' ऐसें युगीं वरि कळीं ' या चरणातून सिद्ध होणारी संख्या ' ८०२१६ ' अशी होईल व ' अङ्कानां वामतो गतिः ' या त्यांनीच सांगितलेल्या नियमानुसार ज्ञानेश्वरीप्रतलेखनाचा हा काल ' ६१२०८ ' असा






मानावा लागेल, आणि ही गोष्ट केवळ अशक्य आहे; कारण शालिवाहन शकाचे '६१२०८' वे वर्ष येण्यास अद्यापि (६१२०८–१९१२=) ५९२९६ वर्षांचा काल उलटावा लागेल. अशा रीतीने त्यांनी सांकेतिक शब्दांच्या आधारे ज्ञानेश्वरीप्रतलेखनाचा काल ठरविण्यासाठी उभा केलेला हा डोलारा कोलमडून पडतो.

तीच गोष्ट त्यांनी ठरविलेल्या ज्ञानेश्वरांच्या निर्वाणशकाची. एक तर 'बाळछंदा' च्या अभंगाच्या ज्या अंशावर विसंबून त्यांनी हा निर्वाणशक ठरविला, तो अंश त्यांच्याच म्हणण्याप्रमाणे 'ज्ञानदेवांच्या संजीवन समाधीचे शेवटचे क्षण टिपणाऱ्या या अभंगात उपस्थितांपैकी कोणी तरी' जोडलेले परिशिष्ट आहे. तो भाग उघडउघड ज्ञानदेवांनी रचलेला नसल्यामुळे त्याचे प्रामाण्य संशयित ठरते. शिवाय त्यांनी या निर्वाणशकासाठी आधार म्हणून घेतलेल्या 'चंद्रार्क तारांगणे। रश्में दान घेतला हरी ॥' या पंक्तीतील सांकेतिक शब्दांतून त्यांना अपेक्षित असणारी '१२०२' ही संख्या सिद्ध होत नाही, ते निराळेच. 'चंद्रार्क' या शब्दातून 'दोन' हा अंक कळतो, असे ते मानतात, ते चुकीचे आहे; कारण 'चंद्र' शब्दातून संकेत कळतो तो 'एक' या संख्येचा व 'अर्क' (म्हणजे सूर्य) या शब्दातून संकेत कळतो तो 'बारा' या संख्येचा. 'चंद्रार्क' शब्दातून 'एक' चंद्र व 'एक' सूर्य व दोन्ही मिळून 'दोन' असा त्यांचा युक्तिवाद असावा, असे वाटते, पण एकदा सांकेतिक अर्थ स्वीकारावयाचा म्हटले की परंपरागत संकेतच मानावे लागतात, नवीन संकेत निर्माण करता येणार नाहीत. 'चंद्रार्क' म्हणजे 'दोन' असा संकेत अन्यत्र कोठे असल्याचेही त्यांनी दाखविलेले नाही. त्यामुळे 'चंद्रार्क' या शब्दातून 'अंकानां वामतो गतिः' या नियमानुसार संख्या सिद्ध होते ती 'दोन' नव्हे, तर 'एकशे एकवीस (१२१)'. पुढे 'रश्मी' किंवा 'रश्में' त्यांना 'बारा (१२)' या संख्येचा कसा बोध होतो, हे त्यांनी स्पष्ट केले नसले तरी 'रश्मी' म्हणजे 'किरण' अर्थात लक्षणेने 'सूर्य' असा अर्थ ते करीत असावेत, असे वाटते. तेव्हा त्यांच्याच पद्धतीने पाहिले तरी 'चंद्रार्क तारांगणें रश्में दान घेतला हरी' या पंक्तीतून सिद्ध होणारी संख्या '१२०१२१' अशी येते. या संख्येचे शालिवाहन शकाचे वर्ष येण्यास अजून (१२०१२१ – १९१२ =) ११८२०९ वर्षे इतका काळ जावा लागेल. अशा रीतीने त्यांनी ठरविलेले हे दोनही काल केवळ हास्यास्पदच ठरतात. शब्दांच्या सांकेतिक संख्यावाचक अर्थावर किती भर द्यावा, याचा विवेक सांभाळणे आवश्यक असते. तो सांभाळला नाही, तर असा अनवस्था प्रसंग गुदरल्यावाचून राहणार नाही. 'शकनिर्देशासाठी सांकेतिक शब्दांचा वापर ही मराठी पोथ्यांत क्वचितच आढळणारी गोष्ट होय', असे त्यांनीच म्हणून ठेविले आहे. तेव्हा इतर काही भरभक्कम उपोद्बलक प्रमाण मिळाल्याशिवाय शब्दांच्या सांकेतिक अर्थाच्या मदतीने शकनिर्देश शोधू पाहणे, हे एक साहसच ठरते व प्रा. सु. बा. कुलकर्णीसारख्यांनीही करावे, याचे आश्चर्य वाटते.

या दोन्ही कालनिर्णयांशी फारसा संबंध नसलेली एक माहिती सांगून हा लेख पुरा करतो. प्रा. सु. बा. कुलकर्णी यांनी श्री. ना. बनहट्टींना पाठनोंदणीसाठी मिळालेल्या शके १४९० मध्ये लिहिल्या गेलेल्या एकनाथी शुद्धीकरणापूर्वीच्या ज्ञानेश्वरीच्या एका प्रतीचा उल्लेख केला आहे व सांप्रत ती कोठे आहे हे कळत नाही, असे म्हटले आहे. माझ्या माहितीप्रमाणे ही प्रत कोल्हापूरचे एक व्यासंगी संशोधक प्रा. पां. ना. कुलकर्णी यांना मिळालेली होती व त्यांनी तिचे संपादन करून ज्ञानेश्वरीसप्तशताब्दीच्या निमित्ताने शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर यांच्यातर्फे तिच्या मुद्रण-प्रकाशनाचीही योजना केली आहे. काही महिन्यांच्या अवधीतच ही एकनाथपूर्वकालीन प्रत सर्वांना मुद्रित स्वरूपात मिळू शकेल, अशी अपेक्षा आहे.

**–रा. पां. निपाणीकर**

* *

अनुक्रमणिका

## सार-संकलन

### अरबांपुढील पर्याय

इराकचे सत्ताधीश सद्दाम हुसेन ह्यांनी शेजारचा लहानसा देश कुवेत एकाएकी गिळंकृत केला त्याला महिना होऊन गेला. आज तरी (१-९-९०) कुवेत इराकच्या घशात अडकल्यासारखा दिसतो. कुवेत हा इराकचा एक प्रांत आहे असे सद्दाम हुसेन ह्यांनी जाहीर केले असले तरी कुवेत पचविणे त्यांना जड जाईल अशी आजची चिन्हे आहेत. इराकने कुवेत तात्काळ आणि विनाअट सोडून द्यावे असा संयुक्त राष्ट्रांच्या सुरक्षामंडळाने त्याला आदेश दिला आहे. इराक असे करेपर्यंत इतर देशांनी त्याच्यावर बहिष्कार घालावा अशी सूचनाही सुरक्षामंडळाने केली आहे. ऑगस्ट २५ रोजी सुरक्षामंडळाने तेरा विरुद्ध शून्य मतांनी (क्युबा आणि येमेन तटस्थ) एक ठराव करून हा बहिष्कार अमलात आणण्यासाठी 'विशिष्ट परिस्थितीत साजेसे उपाय वापरण्याची' परवानगी त्या प्रदेशात ज्यांची नौदले असतील अशा आपल्या सदस्य राष्ट्रांना दिली. म्हणजे थोडक्यात अमेरिकन, फ्रेंच, ब्रिटिश इ. राष्ट्रांच्या युद्धनौकांनी प्रसंगी बळाचा वापर करून इराक-कुवेतकडे जाणारी जहाजे अडविली तरी हरकत नाही असे जाहीर केले. अमेरिका आणि रशिया यांच्यामधील शीतयुद्ध खरोखरीच संपुष्टात आले ह्याची ग्वाही ह्या एकवाक्यतेत जगाला मिळाली. जर इराक-वरील हा आर्थिक बहिष्कार यशस्वी झाला आणि त्याच्या नाड्या आवळल्या गेल्या तर इराकला वठणी-वर आणण्यासाठी प्रत्यक्ष भूमीवर युद्ध करण्याची किंमत मोजावी लागणार नाही. तशी पाळी आलीच तर ज्या राष्ट्रांना ही किंमत द्यावी लागेल त्यांत अमेरिका प्रमुख असणार.

इराकला वठणीवर आणायचे तर जी कृती करावी लागणार त्यात अनेकांचा कस पारखला जाणार आहे. राष्ट्राध्यक्ष म्हणून जॉर्ज बुश यांची कारकीर्द यशस्वी की अयशस्वी ठरते ह्याचा निकाल ह्या परीक्षेत लागेल. संयुक्त राष्ट्रे आक्रमणाविरुद्ध ठाम भूमिका घेऊ शकतात की केवळ औपचारिक निषेधात्मक आवाज काढण्यावर समाधान मानतात ह्याचाही प्रत्यय जगाला येईल. जगात उदयाला आलेली एक नवीन आर्थिक शक्ती म्हणजे युरोपीय राष्ट्रसंघ (युरोपिअन कम्युनिटी.) ज्या वेळी जागतिक परिस्थिती संकटाची असते तेव्हा एकवटून कारवाई करण्याची ताकद त्याच्या ठिकाणी आहे की नाही हेही ह्या परीक्षेत ठरेल. संकटाशी स्वतंत्रपणे मुकाबला करण्याचे सामर्थ्य युरोपीय राष्ट्र-संघात आहे की हा राष्ट्रसंघ म्हणजे केवळ एक आर्थिक रचना आहे ?

ह्या प्रश्नांना लवकरच उत्तरे मिळतील. पण सद्दाम हुसेन ह्यांच्या कारवाईने अरबी जमातीपुढे एक यक्ष-प्रश्न उभा राहिला आहे. जागतिक विरोधाला तोंड देण्यासाठी सद्दाम हुसेन ह्यांनी जे डावपेच केले त्यांचे उद्दिष्ट अरबी अस्मितेला, अरबी राष्ट्रभावनेला आवाहन करणे हे होते. हे आवाहन यशस्वी झाले, सद्दाम हुसेन यांच्या कारवाईला बहुसंख्य अरबांचा पाठिंबा मिळाला, तर मध्यपूर्वेतील परिस्थिती अधिक गुंतागुंतीची होईल आणि भूमीवर युद्ध केल्याशिवाय इराकने केलेल्या आक्रमणाचे निराकरण होणार नाही. मनुष्य-हानी आणि वित्तहानी ह्या दोन्ही दृष्टींनी हे युद्ध सर्वांनाच फार महाग पडेल.

सद्दाम हुसेन यांचे आवाहन यशस्वी होणे शक्य आहे. कारण इराकविरुद्ध उभी राहिलेली अमेरिका, फ्रान्स, ब्रिटन इ. देश पाश्चात्त्य आणि ख्रिस्ती आहेत. आणि पाश्चात्त्य, ख्रिस्ती राष्ट्रांविरुद्ध अरबांचे जुने गाऱ्हाणे आहे. अरबस्तानातून उफाळून आलेला इस्लाम आणि युरोपीय जनसमूहात वसती करून राहिलेला ख्रिस्ती धर्म हे जुने, ऐतिहासिक प्रतिस्पर्धी आहेत.

इतिहासाचा कौल युरोपिअनांच्या बाजूने लागला. सतराव्या शतकापासून युरोपच्या प्रगतीची घोडदौड सुरू झाली. १८ व्या आणि १९ व्या शतकांत युरोपने जग पादाक्रांत केले. विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात जरी जगभरच्या युरोपीय साम्राज्यांचे राजकीय विघटन झाले तरी अजूनही आर्थिक आणि सांस्कृतिक सत्ता आणि तिच्या आधारे लाभणारे राजकीय प्राबल्य युरोप (आणि अमेरिका इ. त्याचे वंशज) ह्यांच्या-कडेच आहे ही वस्तुस्थिती आहे. इतिहासाच्या ह्या वाटचालीत अरब सामील झाले नाहीत. ते बाजूला राहिले; इतिहास त्यांच्या अंगावरून पुढे गेला.

प्रेषित महंमदांच्या मृत्यूनंतर सहा शतके अरबी संस्कृती आणि विज्ञान ह्यांना बहर आला होता. पण नंतर इस्लामी जगावर तुर्कांचे अधिराज्य आले. अरबी देश तुर्की अमलाखाली होते. पहिल्या महायुद्धानंतर

अनुक्रमणिका

ब्रिटिश, फ्रेंच व इटालियनांनी अरबी प्रदेशाचे तुकडे कापून आपापल्या साम्राज्यात दाखल केले. आज अरबी देश नावापुरते स्वतंत्र असले तरी हतबल आहेत. पण हे सर्व इतिहासाने घडवून आणले असे जर अरब मानीत असतील तर ती आत्मवंचनाच ठरेल.

आज एकाही अरब देशात खरीखुरी लोकशाही नाही. ह्या वस्तुस्थितीला इतिहासच जबाबदार आहे असे म्हणता येईल का? सर्व अरबी लोक म्हणजे एक जमात आहे असे मानले तर आजच्या जगातील ती एक मागासलेली जमात आहे असे म्हटले पाहिजे. बहुसंख्य लोक ग्रामीण भागात राहतात, त्यांना शिक्षण नाही आणि काही आखाती तेल-राज्ये सोडली तर सर्व-साधारण अरबांची स्थिती हलाखीची आहे. ही मागासलेपणाची प्रमाण लक्षणे आहेत.

सद्दाम हुसेन ह्यांच्या कारवाईने अरबांना खूप काळ हवी असलेली दोन उद्दिष्टे साध्य होतील अशी आशा ह्या परिस्थितीत काही अरबांना वाटणे शक्य आहे. एक उद्दिष्ट म्हणजे सर्व अरबांची एकी घडवून आणणे. आजचे अनेक अरब देश ब्रिटिश-फ्रेंचांनी ज्या कृत्रिम सीमारेषा पहिल्या महायुद्धाच्या समाप्तीनंतर स्वतःच्या सोयीसाठी आखल्या त्यांतून निर्माण झाले आहेत. उदा., स्वतः कुवेत किंवा सौदी अरेबिया. ह्या सरहद्दी पुसून टाकून सर्व अरबांना एका राज्यात आणणे, एक अरब महासत्ता स्थापन करणे हे अनेक विचारी अरबांचे एक स्वप्न आहे. इराक हे लष्करी दृष्ट्या प्रबळ असे राज्य आहे. तेव्हा सद्दाम हुसेन ह्यांच्या आक्रमक, दांडगट नेतृत्वाखाली हे स्वप्न साकार होईल अशी आशा त्यांना वाटेल. दुसरे उद्दिष्ट म्हणजे पश्चिमी देशांना ताठपणे आव्हान देणे. गेली सत्तर वर्षे ह्या देशांच्या ओंजळीतून अरब राज्ये पाणी पीत आहेत. ह्यामुळे अरबी-स्वाभिमान दुखावतो.

पण ही उद्दिष्टे साध्य करण्यात मूलभूत अडचणी आहेत. अरब हे कोणत्या तरी अर्थाने एक जमात आहेत ह्यात शंका नाही. त्यांची भाषा एक आहे आणि त्यांचा धर्म एक आहे. पण सर्व अरबांचे मिळून एक राज्य बनवायला हे पुरेसे अधिष्ठान नाही. जर्मन, ऑस्ट्रिअन आणि (काही) स्विस यांची भाषा व धर्म एकच आहे. पण त्यांचे मिळून एक राष्ट्र बनत नाही. आजची काही अरब राज्ये ब्रिटिश-फ्रेंचांनी निर्माण केली आहेत हे खरे आहे. पण अनेक अरब राज्यांची मुळे इतिहासात खोल जातात. इजिप्त आणि सिरिया, जॉर्डन आणि इराक व लेबॅनॉन ह्यांच्या बाबतीत वस्तुस्थिती अशी आहे. म्हणून त्यांची एकी करण्याचे प्रयत्न फसले. सर्व अरबांचे एक राज्य किंवा एक संघराज्य स्थापन होण्याची चिन्हे दिसत नाहीत.

ही एकी साधायचा एक मार्ग म्हणजे सर्व अरबांनी पश्चिमेच्या ख्रिस्ती किंवा 'जडवादी' युरोपीय संस्कृतीच्या विरोधात एकवटून उभे राहण्याचा मार्ग. गेल्या शंभर वर्षांत अनेक एकामागून एक धार्मिक नेत्यांनी अरबांना पश्चिमी पाखंडी संस्कृतीचा अव्हेर करून मूळ इस्लामकडे परत वळण्याचे आवाहन केले आहे आणि हे सर्व प्रयत्न फसलेले आहेत. आज अरब देशांची परिस्थिती अशी आहे की त्यांना नवीन तंत्रज्ञानाची आणि भांडवली गुंतवणुकीची अत्यंत गरज आहे. आणि ह्या गोष्टी त्यांना पश्चिमेकडूनच मिळू शकतील. अरब देश दिवसेंदिवस अधिक गरीब होत आहेत. लोकसंख्येच्या वाढीची गती अर्थव्यवस्थेच्या वाढीच्या गतीच्या मानाने कितीतरी अधिक आहे. परिणामी ह्या वाढत्या लोकसंख्येला अन्नपुरवठा करण्यासाठी, घरे बांधून देण्यासाठी पुरेशी साधनसामग्री उपलब्ध नाही. तेव्हा उत्पादन खूप वाढवावे लागेल आणि ह्यासाठी आधुनिक तंत्रज्ञान आणि भांडवल पश्चिमेकडून आयात करावे लागेल. ह्याबरोबरच लोकसंख्येच्या वाढीला आळा घालण्यासाठी परिणामकारक उपाय योजावे लागतील.

सद्दाम हुसेन यांचा मार्ग फसवा आहे. हुकूमशाहीच्या बळावर सर्व अरबांचे राजकीय एकीकरण करण्याचा आणि ह्यासाठी त्यांना अमेरिका-युरोपच्या विरोधात खडे करण्याचा तो मार्ग आहे. पण अरबांना प्रगतीकडे नेणारा मार्ग ह्याच्या नेमक्या विरुद्ध दिशेला जातो. अरबांची प्रगती व्हावयाची तर आजची हुकूमशाही, राजेशाही आणि घराणेशाही ह्यांना तिलांजली देऊन त्यांनी लोकशाहीचा स्वीकार केला पाहिजे. त्यातून उत्पादनाच्या क्षेत्रात नवीन चैतन्य उफाळून येईल. आणि भूतकाळात बहरलेल्या आदर्श इस्लामचे पुनरुज्जीवन करण्याच्या फंदात गुंतून न पडता त्यांनी आधुनिक संस्कृतीचा स्वीकार केला पाहिजे. आणि ह्यासाठी पश्चिमी देशांशी वितुष्टाऐवजी सामंजस्याची वृत्ती स्वीकारली पाहिजे.

## आशियाई क्रीडास्पर्धा

२२ सप्टेंबरला बीजींगमध्ये आशियाई क्रीडास्पर्धा सुरू होते. ही अकरावी आशियाई क्रीडास्पर्धा आहे. चीन यजमान आहे आणि बीजींग शहर घासूनपुसून चक-

चकीत करण्याच्या प्रयत्नात चिनी अधिकारी गुंतले आहेत. आपल्या अपंग नातेवाईकांना दृष्टिआड ठेवावे अशा सूचना नागरिकांना देण्यात आल्या आहेत; मनोरुग्णांना इस्पितळात दाखल करून घेण्यात येत आहे. पाळीव कुत्र्यांवर चीनमध्ये कायद्याने बंदी घालण्यात आली आहे. कारण कुत्रा पाळणे हा उच्चवर्गीयांचा शोक आहे; त्याला चीनच्या श्रमजीवी राजवटीत जागा नाही. तरीही कुणाकडे पाळलेले कुत्रे असले तर त्यांना नष्ट करण्यात यावे असे आदेश देण्यात आले आहेत. सार्वजनिक ठिकाणी चिनी लोक भारतीयांप्रमाणे सहजपणे थुंकतात. आपण थुंकत आहोत हे भानही त्यांना नसते. पण आता रेल्वेस्टेशनभोवती 'आरोग्य अधिकारी' पाळत ठेवीत आहेत. कुणी थुंकताना दिसला तर त्याला जागच्या जागी दंड करण्यात येतो. "उंदराच्या विष्ठेचा एक कण भाताचे सबंध भांडे नासवितो" अशी चिनी म्हण आहे. तिला अनुसरून कडेकोट बंदोबस्त करण्यात येत आहे.

प्रयत्नांची एवढी शिकस्त राष्ट्रे कशासाठी करतात? राष्ट्राभिमानाची भावना, आर्थिक गरज आणि राजकीय महत्त्वाकांक्षा ह्या साऱ्यांचा सहभाग ह्या प्रयत्नामागे असतो. चीनच्या खेळाडूंनी चांगले यश मिळविले तर चीनचे सत्ताधीश त्याचे श्रेय स्वतःकडे घेतील (सेऊल ऑलिम्पिकमध्ये चीनच्या खेळाडूंची कामगिरी इतकी चांगली नव्हती.). स्पर्धा जर सुरळीतपणे पार पडल्या तर इ. स. २००० ह्या वर्षी भरणारे ऑलिम्पिक चीनमध्ये घ्यावे अशी मागणी चीन करील.

आर्थिक बाजू अशी की, परदेशी डॉलरवाले पर्यटक चिनी हॉटेलांत निवास करतील. बीजींगच्या सर्व हॉटेलांत मिळून आजघडीला १४००० खोल्या आहेत. पुढील बारा महिन्यांत त्यांत ६००० खोल्यांची भर पडणार आहे. सध्या ह्यांतील निम्म्या खोल्या रिकाम्या असतात. स्पर्धेमुळे त्या सर्व भरतील. चिनी क्रीडापटूंनी सोनेरी पदके मोठ्या संख्येने मिळविली, प्रसन्न वातावरणात स्पर्धा पार पडल्या तर टियानान्मेन चौकात गेल्या वर्षी चिनी विद्यार्थ्यांच्या झालेल्या कत्तलीचे अपशरण धुऊन निघेल.

पंतप्रधान लि पेंग आणि त्यांचे सरकार यांचे असे मनसुबे आहेत. ते पार पाडले जाण्यात विशेष व्यत्यय येऊ शकेल अशी चिन्हे ऑगस्ट महिन्यापर्यंत तरी नव्हती. फार तर एखादा विशेष बेडर विद्यार्थी निषेधाच्या घोषणा अधूनमधून देईल एवढी भीती होती. आता बीजींगमधील प्रतिष्ठित, संपन्न लोक स्पर्धाविषयी आपल्याला फारसा उत्साह नसल्याचा आव आणतात ही गोष्ट खरी आहे. स्पर्धेचे बोधचिन्ह पॅन-पॅन ह्या नावाचा पॅंडा आहे. त्याचे चित्र आज बीजींगमध्ये कुठेही टाळता येत नाही हे ह्या वैतागाचे एक कारण असेल. दुसरी एक अडचण अशी की स्पर्धांच्या संघटकांना पैसे कमी पडत आहेत. एकंदर खर्च १२·७ कोटी डॉलर एवढा होईल असा अंदाज आहे. तिसरी अडचण अधिक गंभीर आहे. बीजींगजवळ नुकतेच दोन भूकंप झाले. तिसरा राजधानीतच घडेल अशी भीती लोकांत पसरली आहे.



पण टेबल टेनिस, जलक्रीडा, कसरत इ. खेळांत चीनला सुवर्णपदके मिळतील आणि त्यातून देशाभिमानाची लाट कृतघ्न चिनी नागरिकांतही उचंबळेल अशी सरकारची अपेक्षा आहे. पैसे कमी पडतात ते सरकारी लॉटरींची योजना करून भरून काढता येतील. आणि आता फिरून धरणीकंप होणार नाही असे बेछूट आश्वासनही भूगर्भशास्त्रज्ञांकडून देण्याची व्यवस्था करता येईल. अशी व्यवस्था सरकारने अलीकडे केलीही.

पण आखाती देशातील परिस्थिती चिंतेचे खरे कारण ठरली आहे. २ ऑगस्ट रोजी जेव्हा इराकी फौजेने कुवेतवर हल्ला केला तेव्हा शेख फाहद अल् सबा लढाईत मारले गेले. कुवेतच्या राजाचे ते धाकटे बंधू तर होतेच पण आशियाच्या ऑलिम्पिक मंडळाचे अध्यक्षही होते. आशियाई स्पर्धा संघटित करण्याची जबाबदारी ह्या संस्थेवर आहे. ज्या देशांना बीजींगला खेळाडू पाठविणे आर्थिक दृष्टया परवडत नसेल त्यांना अनुदान देण्याचे आश्वासन शेख फाहद यांनी दिले होते.

त्यांच्या मृत्यूनंतर आणि मध्य आशियात युद्धाचे ढग जमत आहेत ह्या परिस्थितीत एकंदर ३८ आशियाई राष्ट्रांतील किती राष्ट्रे आपले क्रीडापटू स्पर्धेसाठी पाठवितील? इराकच्या खेळाडूंना स्पर्धेत प्रवेश दिला तर काही देश बहिष्कार पुकारतील अशी शक्यता आहे. पण चिनी अधिकाऱ्यांचा असा ठाम विश्वास आहे की सगळेजण येणार आणि स्पर्धा अत्यंत यशस्वी होणार. मध्यंतरात बीजींगमधल्या २७१३ कुटुंबांना ती सध्या ज्या घरात राहात आहेत ती खाली करून दुसरीकडे राहायला जाण्याचे आदेश देण्यात आले आहेत. कारण ही घरे पाडायचे ठरले आहे. कारण ती नवीन मानदंडांप्रमाणे (स्टँडर्ड) मान्य होण्याजोगी नाहीत. चकचकीत केलेल्या बीजींगच्या चेहऱ्यावर ती कोडासारखी दिसतील.

अनुक्रमणिका






**‘ उरलं काय ? ’**

गेल्या हिवाळचात पूर्व जर्मनीची कम्युनिस्ट राजवट लोकांनी विरोधी निदर्शने केल्यावर पत्त्यांच्या बंगल्यासारखी कोसळली. ह्या हुकूमशाही राजवटीने केलेली अनन्वित कृत्ये आता जगासमोर येऊ लागली आहेत. ‘स्टासी’ ही गुप्त पोलिस यंत्रणा हे ह्या हुकूमशाहीने लोकांना चिरडण्यासाठी घडविलेले समर्थ हत्यार होते. स्टासीचे ८५००० कायम सेवक होते. शिवाय संशयितांवर नजर ठेवण्यासाठी लक्षावधी लोकांचा स्टासी उपयोग करून घेत असे. ६० लक्ष पूर्व जर्मन नागरिक आणि २० लक्ष पश्चिम जर्मन नागरिक यांच्यावरील अद्ययावत फायली स्टासीकडे होत्या. म्हणजे १/३ हून अधिक पूर्व जर्मन नागरिकांवर स्टासीची पाळत होती.

ह्या पार्श्वभूमीवर ‘उरलं काय ?’ (व्हास ब्लाइब्ट) ह्या जर्मन पुस्तकाच्या अलीकडे झालेल्या प्रकाशनानंतर उठलेल्या वादळाकडे पाहिले पाहिजे. ख्रिस्ता वुल्फ ह्या पूर्व जर्मन लेखिकेने ते लिहिले आहे. इतकी सारी वर्षे ही लेखिका पूर्व जर्मन साहित्यिकांची अधिकृत प्रवक्ती होती; कम्युनिस्ट हुकूमशाही राजवटीला ती पाठिंबा देत होती. प्रतिष्ठा, मानसन्मान ह्या गोष्टी तिला राजवटींकडून लाभत होत्या. आता स्टासीने आपल्यावर दहा वर्षे कशी पाळत ठेवली होती आणि आपल्याला किती त्रास दिला ह्याची कहाणी ‘उरलं काय ?’ ह्या पुस्तकात विस्ताराने सांगितली आहे. पुस्तकाचे टीकाकार विचारत आहेत की बाईंनी इतकी वर्षे काय केले ? हुकूमशाही राजवटीचे गोडवे गाणारी आणि म्हणून पर्यायाने गुप्त पोलिस यंत्रणेचे समर्थन करणारी ही लेखिका आता अचानक आपण ह्या राजवटीचे बळी कसे होतो ह्याचे वर्णन करते हे काय गौडबंगाल आहे ? त्यांची कहाणी जर खरी असेल तर इतकी वर्षे त्यांनी ती प्रकटपणे का सांगितली नाही ? कम्युनिस्ट राजवटीचे जे जाहीर समर्थक होते आणि ज्यांनी राजवटीत मानसन्मान भोगले ते आणि तिला ज्यांनी विरोध केला आणि तिच्या दडपशाहीचे जे बळी ठरले त्यांच्यातील भेदरेषा पुसून टाकण्याचा हा डाव तर नाही ?

पण काही पश्चिम जर्मन लेखक श्रीमती वुल्फ ह्यांच्या बाजूने उभे राहिले आहेत. उदा., ग्युंटर ग्रास आणि वॉल्टर येन हे प्रसिद्ध साहित्यिक. त्यांचे म्हणणे असे आहे की हुकूमशाही राजवटीत राहून तिच्याशी मुकाबला करण्याचा प्रसंग ज्यांच्यावर येतो त्यांनाच असे करण्यातील अडचणींची आणि धोक्यांची खरी कल्पना असते. तेव्हा अशा राजवटीत राहून तिला तोंड देण्याचे धैर्य ज्यांनी दाखविले आहे त्यांनाच फक्त श्रीमती वुल्फ ह्यांच्यावर टीका करण्याचा अधिकार आहे.

पश्चिम जर्मनांना परिचित असलेला असा हा युक्तिवाद आहे. नात्सी राजवटीत ज्यूंचे जे भयानक शिरकाण झाले ते होत असताना त्याची माहिती अनेक जर्मनांना होती. पण फारच थोडे जर्मन वगळले तर इतर कुणी निर्घृण नात्सी राजवटीला विरोध केला नाही. दुसऱ्या महायुद्धाच्या समाप्तीनंतर जेव्हा जर्मनांनी आत्मसंशोधन सुरू केले तेव्हाही हा युक्तिवाद पुढे आला. आधुनिक हुकूमशाही राजवटीला आतून विरोध करणे सोपे नसते. असे करण्यातल्या अडचणींची कल्पना जे तिच्या तावडीत सापडलेले असतात आणि शक्य तेवढा विरोध तिला करीत असतात त्यांनाच येऊ शकते. ज्यांनी अशा राजवटीला आपली निष्ठा वाहिलेली असते, जे तिच्याशी नाइलाजाने सहकार्य करतात, जे सहकार्य करण्याची आणि निष्ठेचीही वरकरणी बतावणी करीत असतात पण आतून विरोध करतात त्यांच्या वर्तनात बाह्यात्कारी काही भेद आढळणारही नाहीत. सरळ विरोध करून, निश्चित मृत्यूला कवटाळणे हे हौतात्म्य खरे. पण राजवटीला दुबळी करून उलथून टाकणे हे जर साध्य असेल तर ते साधण्याच्या दृष्टीने असे हौतात्म्य पत्करणे हा मनुष्यबळाचा अपव्ययही ठरेल, इ.

ह्या युक्तिवादात तथ्य नाही असे नाही. नात्सी राजवट जबरदस्त होती. तुलनेने पूर्व जर्मनीची कम्युनिस्ट राजवट बरीच दुबळी होती. गेल्या हिवाळचात जेव्हा लोकांनी निदर्शने केली तेव्हा तिचा दुबळेपणा उघड झाला. ती एकाएकी कोसळली. लोकांना त्याचा आनंद वाटला पण त्याबरोबरच लाजही वाटली. ह्या सत्ताधाऱ्यांना दूर करणे जर इतके सोपे होते तर आपण त्यांची दादागिरी इतकी वर्षे सहन तरी का केली ?

पूर्व जर्मनीतील जे लेखक, संगीतकार आणि इतर कलावंत आंतरराष्ट्रीय प्रतिष्ठा पावले होते त्यांना देशात मानवी स्वातंत्र्याची परत स्थापना करण्यासाठी काय करता आले असते ह्याचा शोध घेण्यात आज अनेक मग्न आहेत. (३० नोव्हेंबर १९९०)





अनुक्रमणिका

हे मासिक श्री. ग. दीक्षित यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून मे. पुं. रेगे यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.




